# अनुक्रमणिका



---


मूल्य १॥ रुपया

प्रथमावृत्ति मे १९४५




---


प्रकाशक : शं. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई

मुद्रक : अ. मु. नाडकर्णी, अत्रे प्रिंटिंग प्रेस, २६२ विठ्ठलभाई पटेल

# लाटांचें तांडव

## ( पू. काकासाहेबांच्या पत्रांतील उतारा )

...... " या ' लाटांचें तांडव ' मधील सर्वच वर्णनें उत्तर भारतांतील आहेत. सध्यां हिंदुस्थानच्या मध्यावर रहात असल्यानें दोन्हीकडे नजर सहज सारखीच पोंचते. लेखांचीं नुसतीं नांवें वाचूनच पुनः त्या त्या ठिकाणीं जाऊन आल्याचा आनंद होतो. ' दुणावें कीं देतां ' हा अनुभव केवळ विद्येपुरताच नाहीं. आपला आनंद इतरांपुढें व्यक्त करतांना तोदेखील दुणावतो. गुजरात-मधल्या वाचकांना या लेखांच्या द्वारें देशभर हिंडवून आणतांना एकप्रकारचा आनंद झाला होता. आतां महाराष्ट्रांतील वाचकांना या ग्रंथाच्या द्वारें उत्तर-हिंदुस्थानांत थोडेसें हिंडवून आणणार आहें, या कल्पनेनेंच मला कितीतरी सुख होतें. घड्याळाचे काटे सर्व वर्तुळ फिरतात, पण केंद्ररूपी आपलें घर मात्र सोडीत नाहींत. साहित्यामार्फत प्रवास करीत असतांना लेखकांचें आणि वाचकांचें तसेंच नाहीं कां होत ? लेखक आपल्या ठिकाणीं आणि असंख्य वाचक आपापल्या ठिकाणीं बसले असूनहि जणूं काय दोघे हातांत हात घालून बोलत बोलत कधीं हरिद्वार-डेहरादूनच्या बाजूला, कधीं काश्मीरांत, कधीं सिंधमध्यें, तर कधीं काठियावाडमध्यें, कधीं दिल्लीला, तर कधीं बिहारमध्यें स्वैर विहार करूं शकतात हा आद्यलिपिकार गणेशाचा आणि साहित्यस्वामिनी सरस्वतीचा कृपाप्रसाद आहे.

प्रस्तुत लेखसंग्रहांत मुख्यत्वें उत्तरेकडील निसर्गाचीच उपासना आहे; पण त्याबरोबर त्याच प्रदेशांत जवळ जवळ चाळीस वर्षे कल्याणमार्गाचा उपदेश करीत हिंडणाऱ्या आर्यपरिव्राजक तथागत बुद्धाचेंहि स्मरण आहे.

बुद्धभगवानांचे समकालीन श्रमण जीवनवीर महावीर स्वामी यांचेंहि स्मरण देखाव्यामुळें होतें, ही समाधानाची गोष्ट अनायासें साधली आहे.

निरनिराळया वेळीं देशाचें जें विविध दर्शन घडलें आणि तो आनंद व्यक्त करतां करतां स्मरणवृक्षावर जीं भक्तिकुसुमें फुललीं, तीं कोणत्या समानधर्मी प्रवाशाला पुढें करून देशाच्या चरणीं अर्पण करावीं, असा प्रश्न मनांत उठला असतांना प्रथम स्मरण झालें देवर्षि नारदाचें, आणि त्याचे पाठोपाठ स्मरण झालें क्षत्रिय-ब्राह्मण परशुरामाचें. हे दोघेंहि पर्यटनपटु भारतीयांचे यात्रागुरु आहेत. पण त्यांच्याशीं समानधर्मा स्वतःला म्हणवून घेण्याची हिंमत कोणचा आधुनिक करूं शकेल ? तसलें धाष्टर्य जर कोणी करूं गेला, तर वरील दोघांचें अनुकरण करणारा बलराम त्याच्यावर आपला नांगर उगारल्यावांचून रहाणार नाहीं. तेव्हां नम्रपणें या तिन्ही यात्रिकांना नमन करावें आणि त्यांचा आशिर्वाद मागावा हेंच उचित आहे. ”

स्पेशल जेल<br>सिवनी<br>२७-१-४५

काकांचे सप्रेम वंदेमातरम्

## लाटांचें तांडवनृत्य



कोणतेंहि नैसर्गिक दृश्य पहिल्यांदांच पाहतांना जी अनुभूति होते, तिचा प्रत्यय दुसऱ्या पाहण्यांत येत नाहीं. प्रथमदर्शनीं सर्वच नवें नवें भासतें. ज्या गोष्टी पूर्वी ज्ञात नव्हत्या, त्यांचा परिचय करून घ्यावासा वाटतो. पावलोंपावलीं आश्चर्य व चमत्काराचा अनुभव येतो. दुसऱ्या खेपेला मात्र चमत्कृति थोडी कमी होते. कारण, त्या स्थळीं काय काय आहे याचा माणसाला अंदाज असतो. परिचित गोष्टींविषयीं प्रेम वाटेल, पण आश्चर्य आणि चमत्कृति फक्त अपरिचित गोष्टींच्या बाबतींतच शक्य असतात.

कराचीजवळील मनोऱ्याच्या * लाटा पहावयासाठीं या खेपेला मी जो गेलों, तो औत्सुक्यरहित पण प्रेमपूर्ण वृत्तीनें ! खरें म्हणजे परिचित तरुण मित्रमंडळींशीं या रम्य ठिकाणीं मला विश्रब्धपणें गुजगोष्टी करतां येतील, या आशेनें मला तेथें नेलें. मी मनाची अशीच समजूत करून गेलों होतों कीं, तेथील लाटांकडे पाहून फार तर आनंदाचें भरतें येईल. यापेक्षां अधिक कांहीं घडणार नाहीं.

उसळणाऱ्या लाटांचें धवलहास्य चित्रांकित करण्यासाठीं मी गेल्या खेपेला निरनिराळीं छायाचित्रें घेतलीं होतीं. परंतु, यापैकीं एकहि चांगलें उतरलें नव्हतें. हा विषाद मनांत असल्यामुळें या लाटांबद्दल थोडा अमर्षहि मला वाटत आला होता. म्हणून फक्त गप्पागोष्टींना अनुकूल असें वातावरण तेथें सांपडेल येवढीच अपेक्षा आणि आशा आम्हीं केली होती.

* कराची बंदरांतील एका सुंदर बेटाचें हें नांव आहे.

पण तेथें पोंचल्यावर मला काय दिसलें ? गेल्या खेपेला जें दृश्य नजरेस पडलें होतें आणि ज्याचीं काव्यमय चित्रें मीं आपल्या चित्तांत सांठवून ठेवलीं होतीं त्या चित्रांना फिक्कें पाडून मनाच्या फलकावरून तीं पुसूं पहाणाऱ्या लाटांचें एक तांडवच एकाएकीं समोर उभें राहिलें. मग कुठल्या गुजगोष्टी आणि कसले विश्रब्ध आलाप ! तें तांडव म्हणजे मनाला उन्मत्त करणारें मादक असें पेयनिधानच भासलें. जर तिथें मी एकटा असतों, तर त्या तांडव-नृत्यांशीं ' हरि ॐ ' म्हणून समरस होऊं इच्छिणाऱ्या आंतरिक प्रेरणेला मी क्वचितच दाबूं शकलों असतों.

एकानें तान छेडली कीं, दुसऱ्यालाहि गावेंसें वाटतें. एका कोल्ह्यानें रात्रीच्या शांततेविरुद्ध बंड उभारलें कीं सगळेच क्रांतिकारी कोल्हे आपल्या फुप्फुसाच्या कसरतीची त्याला जोड देणारच ! जरा सतारीच्या वरच्या तारा छेडून पहा, खालच्या तारा निमिषार्धांत आपोआप आपला आनंदझंकार सुरूं करतात. मग माझ्यासारख्या निसर्गवेड्या जीवानें सृष्टीच्या भव्यतेचें दर्शन झाल्याबरोबर आपला दुजाभाव विसरून जाणें हें मानवी शहाणपणाच्या तुलनेनें एक नवल भासलें तरी त्यांत अशक्य असें काय आहे ?

हत्तीचा सारा रुबाब त्याच्या गंडस्थळांत केंद्रीभूत असतो. किल्ल्याचें सौंदर्य त्याच्या गजेंद्रभव्य बुरुजांत असतें. जहाजाचा डौल वरच्या शीडांत भर-लेला असतो. तद्वत् मनोऱ्याच्या टोकाला किल्लयासारख्या ज्या भिंती आहेत त्यामुळें या बेटाचें इकडील सौंदर्य खुलून दिसतें. समुद्राच्या लाटा याच ठिकाणीं वप्रक्रीडा करून आपली खवखव शमवितात. हा कंडु-विनोद अविरत चाललेला असला, तरी त्याचा कंटाळा मात्र येत नाहीं. हें दृश्य चिरमनोहारी आहे. मानवानें येथें एक लहानशी भिंत बांधून समुद्राच्या लाटांना असीम चीड आणली आहे. आणि इतकीं वर्षें झालीं तरी लाटांनीं हा हस्तक्षेप सहन केला नाहीं; सहन करणेंहि कधीं शक्य नाहीं. या अपमानाचें जेव्हां जेव्हां त्यांना स्मरण होतें, त्या त्या वेळीं मोठा दळभार घेऊन या भिंतीवर त्या लाटा आक्र-मण सुरूं करतात आणि दगडांना नामोहरम करण्यासाठीं परस्परांना प्रोत्साहन

देत असतात. किती तो त्यांचा उन्माद! केवढी ती त्यांची भीष्मप्रतिज्ञा! किती भयंकर त्यांची ती घातक मुसंडी! आणि आज तर तो अमर्ष उधानाच्या भरतीनें उफाळत होता. मग काय विचारतां? साऱ्या शिवगणांना एकत्र करून वीरभद्र जणुं लाटांच्या रूपानें प्रलयच मांडूं पहात आहे!

एकेक लाट म्हणजे जणुं एकेक उसळणारी टेकडीच. ती उत्तुंग शोभा पाहून दुसऱ्या लाटांनीं तिचें कौतुक करायला हवें; पण तें सोडून त्या दोघी एक होतात व नवाच उच्चांक गाठतात. येवढेंच काय, पण आसपासच्या लाटांना देखील आपल्या इतकें उच्चत्वाला पोंचण्यासाठीं उत्तेजित करीत राहतात. हें नृत्य एका क्षणाचीहि उसंत न घेतां अव्याहत चालू असतें. त्याकडे अगदीं टक लावून पाहत बसलें, तर त्यांत एक तऱ्हेचा प्रचंड ताल असल्याचा प्रत्यय येतो. जणुं शिवतांडव स्तोत्राचें प्रमाणिका वृत्त आपली शक्तीच अजमावूं पाहत आहे! हृदय भरून येऊन ओघ वाढल्यामुळें पाहतां पाहतां प्रमाणिकेचें पंचचामरांत रूपांतर होतें आणि मग आपल्या प्रतिष्ठेचें भान न राहून पुष्पदन्तहि तांडवनृत्यांत सामील होतो.

ज्या बाजूला लाटा जोरानें भडिमार करतात व जेथें सतत आदळणाऱ्या लाटांचा फवारा उडून आकाशांत एक मोठें इन्द्रधनुष्य निर्माण होतें, त्या बाजूलाच कित्येक पायऱ्या अखंड स्नान करणाऱ्या ऋषीप्रमाणें ध्यानस्थ बसलेल्या आढळतात. लाटांचें पाणी त्यांच्या शिरोभागीं पडून, हंसत हंसत व गोमुत्रिका बंध करीत पायऱ्या उतरत जात असतें. दिल्ली, आग्रा, काश्मीर किंवा म्हैसूरचें वृंदावन येथें माणसानें विलासाचीं जीं साधनें निर्मिलीं आहेत आणि पाण्याचा प्रवाह श्रावण-भाद्रपदाच्या ओघानें वाहविला आहे, त्याचें येथें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं.

परंतु, कित्येक लाटा तर त्या लांबलचक भिंतीशीं टक्कर खाऊन तिच्या डोक्यावर पाण्याच्या मोठमोठ्या सरी उडविण्यांतच मग्न असतात. लाट येऊन आदळते, भिंतीवर चढते, आणि भिंतीच्या उंचीची पर्वा न करितां तिथून खालीं उडी घेते. ह्या होळींतील पिचकाऱ्या दुरून आपल्याकडे धांवत येतात.

तो अनुभव सर्वच प्रकारांनां उन्मादक असतो. त्या सरींतून व त्या इंद्रधनुष्यांतून बाहेर फुटणारे व पसरणारे पाण्याचे तुषार सारें वातावरण गारीगार करून टाकतात. त्यांना असें वाटतें कीं, हा लाटांचा महोत्सव पाहण्यासाठीं आलेल्यांचें स्वागत करण्याची जबाबदारी त्यांच्या माथीं पडली आहे. हे खरोखरीच देवबिंदु पाषाणांवर थेंबाथेंबानें जेव्हां येऊन बसतात, तेव्हां आपल्यालाहि असें वाटतें कीं, आपण नागरिक नव्हत, गांवच्या वस्तीशीं आपला कांहीं संबंध नाहीं, आपण तर वरुणाच्या सागरराज्यांतले प्रजाजन आहोंत !

आणि महासागरावरून वहात येणारा शुद्ध समीर म्हणतो, "या दृश्याचा पाहुणचार स्वीकारण्याची शक्ति तुमच्या पामर हृदयांत कोठून असणार ! चला, मी तुम्हांला दुरदुरून आणलेल्या ओझोनची (प्राणवायूची) दीक्षा देतों. ओझोननें तुमचीं हृदयें पवित्र होतील; फुप्फुसें प्राणमय होतील. आणि त्यानंतर तुम्हीं येथलें वातावरण आणि उदावरण सहन करूं शकाल."

याचा प्रत्यय देखील खरोखरच आम्हांला आला. प्राणवायूच्या श्वासोच्छ्वासामुळें प्रत्येकाच्या मुखावर उषेची लाली दिसूं लागली.

आम्हीं आठ जण होतों. आठहि बाजू पाहून देखील आमची तृप्ति होईना. ह्याच ठिकाणीं आमच्यांतील एक सिंधी बंधू एका शिळेवर बसून त्या विशाल दृश्यकाव्याचें अगदीं एकतेनें आकंठ पान करीत होता. बोलणें नाहीं, चालणें नाहीं, हंसणें नाहीं कीं गाणें नाहीं ! तल्लीन होऊन थोडासा डोलत असेल तेवढाच ! आम्ही गप्पा मारीत होतों. हृदयाच्या उद्गारांना मुखावाटे वाव देत होतों; पण या सर्वांची त्याला मुळींच क्षिति नव्हती. त्याला जणूं मानवांचें मुख नकोच होतें. त्या लाटांची मस्ती आत्मसात् करावयाची होती, पिऊन, जिरवून टाकयची होती. मांडी मारून व त्यावर कोंपर टेकून नम्रपणें तो सागरध्यान करीत होता. त्याच्या विंचरलेल्या केसांच्या भागांत सीकरबिंदूंची मुक्तामाला चमकत होती. जणुं वरुणदेवानें आपला वरदहस्तच त्याच्या मस्तकावर ठेवला होता !

स्थानांतर करून करून अनेक दृष्टिकोणांतून आम्ही तें दृश्य पाहिलें. त्यामुळें लाटांच्या मनांत आमच्याविषयीं सद्भावना निर्माण झाली. त्या आम्हांला म्हणू लागल्या, " या, या, इतक्या दुरून काय पाहतां ? तुमच्या विषयीं आमच्या मनांत परकेपणा मुळींच नाहीं. असे जवळ या ना ! हसा खेळा. क्षणभर मौज करा कीं ! या क्षणांत आणि अनंत काळांत कांहीच फरक नाहीं. चला या -"

लाटांचा शिष्टाचार कांहीं विचित्रच ! निमंत्रण देतांना त्या हात धरणार नाहात, तर पाय धुतील. आम्ही त्या निमंत्रणाचा औपचारिक स्वीकार करून म्हटलें, " यावेंसें तर फार वाटतें; पण यावें कसें ? अजून आमचें कार्य संपलें नाहीं. कितीतरी करावयाचें आहे. कित्येक संकल्प अद्याप पुरे व्हावयाचे आहेत. जिच्या चरणाचें तुम्ही अखंड प्रक्षालन चालविलें आहे ती भारतमाता अजून स्वतंत्र झाली नाहीं, माणसामाणसांतील विद्वेष अजून निमाला नाहीं, गरीब व दलित जनतेशीं आम्ही अजून तादात्म्य पावलों नाहीं. तोंपर्यंत तुमच्याशीं तादात्म्य पावण्याचा अधिकार आम्हांला देईल कोण ? तुम्ही मुक्त आहांत. अखंड कर्मयुक्त आहांत. सतत आणि नियत कर्म करीत असूनहि कर्तव्य म्हणून तुमच्यासाठीं कांहीं उरलेलें नाहीं. आणि आम्हीं कर्तव्याचा ढीग समोर पडला असूनहि आळशी बनलेले आहोंत. तुमच्या संगेंत असून तुम्हांसवें नाचण्याचा अधिकार आमचा नव्हे. आम्हांला तुम्ही प्रेरणा द्या तुमचा स्वच्छंद आमच्या हृदयांत भरा. तुमचा वेदांत आमच्या चित्तांत प्रेरा. म्हणजे आमचें कार्य पुरें व्हायला, आमचा देश स्वतंत्र व्हायला वेळ लागणार नाहीं. तेवढ्या एकाहि संकल्पाची सिद्धि जर झाली तर मनांत कसलाहि विषाद न धरतां आम्हीं तुमच्यापाशीं धांवत येऊं, तुमच्याशीं अद्वैत साधू आणि तसें करतांना जर हीं हाडें, हें मांस आड येईल, तर अडचणरूप भासणारे कपडे ज्याप्रमाणें फाडून टाकावे लागतात, त्याप्रमाणें या देहाचाहि चूरचूर करून टाकूं ! आणि त्या गोळ्याला नवा आकार येत आहे असें पाहून स्फूर्तिफुल्ल होऊं !"

त्या धांवपळींतहि लाटांनीं आमचें म्हणणें ऐकून घेतलें व शेवटीं त्या येवढेंच म्हणाल्या, "ठीक, तुम्हांला जमेल तेव्हां या. या किंवा येऊं नका. आमचें हें तांडव नित्य चालूच रहाणार. जीवनाची रासक्रीडा संपवून गोपी इथें आलेल्या आहेत. संसार-चक्रांतून मुक्त झालेल्या साधुसंतांनीं, फकीरांनीं, अवलियांनीं यांत भाग घेतलेला आहे. वैज्ञानिक व सत्याचे उपासक यांत सहभागी होऊन शांत झाले आहेत. व म्हणून आमचा हा वीचिसंघ अखंड अशांतता माजवीत असून देखील शांततेचें सागरसंगीत ऐकवीत आहे, ऐकविलें आहे आणि ऐकवीत राहील. तुम्हांला ऐकूं येतें ना तें संगीत ?"

---

## संध्यारस २

गौरीशंकर* तलावाचें दर्शन अचानक घडतें. आम्हीं बगिच्यांत गेलों. झाडांचें सौंदर्य निरखलें. चिनीमातीच्या तुकड्यांनीं बनविलेल्या निर्जीव हत्ती, घोडे, वाघ आणि सिंह यांची ऐट पाहून झाडांतून बागडणाऱ्या सजीव पक्ष्यांचा कलरव ऐकत ऐकत तलावाच्या कांठीं येऊन पोंहचलों. पायऱ्या चढूं लागलों. गार वाऱ्याची झुळुक येऊं लागल्यामुळें मनास शांतता वाटूं लागली. तरीहि तलाव कसा असेल याची कल्पना येत नाहीं. अगदीं शेवटच्या पायरीवर पाय ठेवला म्हणजे जणूं एकाएकी आकाशाचा पट चिरून एकादीं अप्सराच आपल्या समोर अवतीर्ण व्हावी तसें सरोवराचें पाणी स्मित करीत आपणांकडे पहात असल्याचें दृष्य दिसतें. सरोवराचें दर्शन घेण्यासाठीं आपण जरीं एकटें गेलों तरी तेथें आपण एकटेंच राहाणार नाहीं. आकाशांतील मेघपांक्ति आणि उतावीळपणें धावपळ करीत आलेली संध्यातारका आपल्या-प्रमाणेंच सरोवराचें सौंदर्य निरखीत असलेली आपल्याला दिसेल.

सरोवरें बहुधा खोलगट जागेंत असतात. डोंगराच्या पायथ्याशीं जावें तेव्हांच पादप्रक्षालनाचा लाभ घडायचा. पण हें सरोवर जणूं कांहीं गंधर्व-कासार! ढगच जणूं वितळून टेकडीच्या माथ्यावर उंचबळत आहेत!

ज्याचा पलिकडचा कांठ दिसूं शकतो असें सरोवर कोणाला आवडेल? इतकें पाणी कोठून येतें असली अतृप्त जिज्ञासा ज्याच्या बाबतींत वाटत नाहीं त्याच्या सौंदर्यांतहि दैवी, गूढ भाव कोठून आढळणार?

* भावनगरचा 'बोर' तलाव

आगगाडीचा मार्ग अगदीं सरळ असला तर तोसुद्धां आपल्याला आवडत नाहीं. उंच असेल, सखल असेल, डावीकडे किंवा उजवीकडे वळत असेल तरच त्याला शोभा! सरोवर म्हणजे कांहीं धबधबा नव्हे कीं त्यानें वरखालीच्या क्रीडा करून दाखवाव्यात. गौरीशंकर चोहोंकडून टेकड्यांनी वेढलेला आहे. परंतु, त्या टेकड्या जीवावर उदार झालेल्या वीरांप्रमाणें गर्दी करून उभ्या राहिलेल्या नाहींत. त्यामुळें पाण्याला "इकडे तिकडे चोहींकडे" पसरण्याला पैस मिळाला आहे.

सरोवराचे कांठावरून पश्चिमेकडे पाहिलें असतां भिन्न भिन्न रंग पाण्या वर पसरलेले दृष्टीस पडतात. जणूं एकाद्या अद्‌भुत कादंबरींत नवरस गुंफलेले असावेत तसे! पायाखालीं आत्महत्येचा दाट शेवाळी रंग जणूं क्षणाक्षणाला आपणांला निमंत्रण देत असलेला भासतो; पण त्यांतहि सगळीकडे सारखेपणा नाहीं. कोठें मेंदीच्या पानाचा दाटसर, तर कोठें लिंबाच्या पानाचा हिरवा. अगदीं न्याहाळून पाहिलें तर वाटतें कीं, तो पाण्याचा रंग नसून पाण्यांत लपलेलें वेगळें विष आहे. ज़रा पुढें नजर फेंकली तर, निराशेतून आशा प्रगट व्हावी तसा बदामी रंग दिसेल. पण त्या बदामी रंगांत धातूची चकाकी आहे. आणखी जरा पुढें. आणि तोच रंग थोड्या फरकानें नारंगी बनून संध्येचें उपस्थान करीत असलेला दिसेल. ढगाची जांभळी छाया जर मध्यें पडली नसती, तर इकडच्या नारंगी आणि पलीकडच्या सोनेरी रंगामधील सौंदर्य किती खुलून दिसलें असतें!

सोनेरी रंगाकडे आपलें लक्ष वेधलें जाण्यापूर्वीच 'मंदमंद मधुगंध समीर' जलपृष्ठावर सूक्ष्म वीचिमाला निर्माण करून आपल्याला म्हणतो, 'ऐका हें समयो-चित स्तोत्र!' समोरच्या टेकडीनें आपलें डोकें वर काढलें नसतें तर ही रसवती पृथ्वी कोठें संपते आणि निःशब्द आकाश कोठून सुरू होतें तें सांगणें एकाद्या पंडितालाहि कठिण झालें असतें.

डावीकडे मेंदीचें कुंपण आहे. व्यवस्थित कुंपणें पाहणें कोणाला आवडत नाहीं! परंतु, शृंगारसाधिका मेंदीचा होणारा शिरच्छेद मला अगदीं असह्य

वाटतो. उजवीकडे थंड झालेल्या, परंतु न थिजलेल्या सूर्याच्या तेजासारखें भासणारें सरोवर आणि डावीकडे खालच्या बाजूला दाट विरळ झाडी. अशा प्रकारच्या परस्परभिन्न रसांमधून जनकाप्रमाणें योगयुक्त चित्तानें आम्ही पुढें निघालों.

आणि मग निराधार सेतु लागला! संस्कृत कवींनीं जर तो पाहिला असता तर त्याचें नांव त्यांनी "शिक्यसेतु" च ठेवलें असतें. अशाप्रकारच्या पहिला–वहिला शोध हिमालयांतील वनचरांनीच प्रथम लावला असावा. हा निराधार पूल अगदीं हलक्या पावलांनीं आपल्याला घेऊन जातो. पाण्यांत तप करणाऱ्या ऋषीसारख्या भासणाऱ्या एका बेटाच्या जटाजुटांत पुलाच्या मधोमध पोंचलों कीं, आतिथ्यशील पाणी 'जपून चला, जपून चला' अशी सारखी सूचना देत असतें आणि योग्य संधि मिळाल्यास पादप्रक्षालन करण्यासहि चुकत नाहीं.

आणि तें द्वीप? नीरव शांततेची जणुं प्रतिमाच! पाण्यांत चंद्रमा इतका खदखदून हंसतो आहे, पण त्याचा पडसाद कोठेंहि एकूं येत नाहीं. निसर्गाला जणु भीति वाटत असावी कीं न जाणों, ध्यानस्थ मुनीच्या शांतिचा भंग व्हायचा! ह्या बेटांत सापहि नाहींत आणि सरडाहि नाहीं. पक्षी असलेच तर ते आपापल्या घरट्यांत निश्चिंतपणें झोंपलेले आहेत. अतिथि मंडपाखालीं आम्ही विराजमान झालों. आतां तर पाण्यावर गूढ अंधकाराची छाया पसरूं लागली होती. अष्टमीचें चांदणें पाण्यांत सरळ सूर मारून पाण्याच्या तळाशीं जात होतें. फक्त हाडवैरी सुरासुरांचे गुरु दीर्घ विग्रहाला कंटाळून शिष्टाई करण्यासाठीं जमावेत तसे पश्चिमेकडे चमकत होते. प्रकाशांत आणि अंधःकारांत संधी करण्याचा प्रयत्न संध्येनें अनेकवार करून पाहिला. जर तिला त्यांत कधींकाळीं यश आलें, तरच सुरासुरांतील भांडण कायमचें मिटावयाचें! पहा, दोघांचेंहि गुरु आपलीं तोंडें फिरवून आपल्या स्वभावोचित गतीनें चालूं लागले. आणि संध्याकाळचा रक्तकालिमा दोघांनाहि कांहीं एक भेदभाव न ठेवतां ग्रासून टाकीत आहे. नेहमीं विग्रह चालविणाऱ्यांचा अस्त व्हायचाच!

आतां पाण्यानें आपला रंग बदलला. आतांपर्यंत चंदेरी रस्त्याप्रमाणें पाण्याच्या सपाटीवर उगीच दिसणारे पट्टे नाहींसे झाले. खेळ फार झाला. आतां गंभीर होऊन विचार केला पाहिजे, असें कांहींसे वाटल्यावरून पाण्याची मुखमुद्रा अंतर्मुख झाली आहे. प्रेतयोनींतील वासनादेह विचरत असावेत तशा या टेकड्या दिसूं लागल्या. विस्तीर्ण शांततादेखील किती अस्वस्थ करूं शकते याचा प्रत्यय येथें पूर्णपणें येतो. साऱ्या टेकड्या जणूं आपलाच शब्द ऐकण्याच्या उत्कंठेनें उभ्या आहेत! जरा आवाज केला तरी 'हो हो! ह्या पहा आम्हीं आलों, ह्या आलों!' असें म्हणत येतील हें अगदीं निःसंशय. परंतु त्यांना बोलावण्याची हिंमत कशी होणार?

अगदीं मध्यरात्रीं कोणीं पहात नसेल तेव्हां ह्या टेकड्या आपलीं वसनें काढून ठेऊन सरोवरांत आंघोळीला उतरत असतील काय? आज तरी त्या तसें करणार नाहींत. कारण, 'दुर्विनीत' चंद्रमा मध्यरात्रींपर्यंत टक लावून सरोवराकडे पहात असणार! आणि तत्पूर्वी, शिशिराची थंडी आपलें साम्राज्य स्थापन करणार! उषःकालापूर्वी माघस्नान करण्याची त्यांची मनीषा असेल तर गोष्ट वेगळी! अशाच कांहीं पुण्यसंचयावांचून टेकड्यांना इतकी स्थिरता मिळवितां आली नसेल!

पुलावरून कोणीतरी जात आहे वाटतें. पाण्याचा खळखळाट कानांवर येत आहे आणि त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या लाटांची वर्तुळें दूरदूर पळत आहेत. लोक खेड्यांत रहात असले, तरी ज्याप्रमाणें त्यांच्यामार्फत बातम्या दूरदूरचा प्रवास करतात, त्याप्रमाणें पुलाजवळचा हा जलक्षोभ किनाऱ्यापर्यंत जाऊन पोंचायचाच! शरीरांत एका ठिकाणीं जरी लागले तरी त्याच्या संवेदना जशा शरीरभर पसरतात, तसें पाण्याचेंहि आहे. पाण्याच्या शांततेचा भंग झाला तर त्यामुळें त्याच्या उदरांत प्रतिबिंबित झालेलें सारें ब्रह्माण्ड डोलूं लागतें.

आतां तारकांची रासक्रिडा सुरू झाली. पाण्यांतहि त्याचें अनुकरण दृष्टीस पडतें. परंतु, भूमंडळावरचा ताल कांहीं वेगळाच!

---

## नदीचें सरोवर ३

### ( एक पत्र )

**आपल्या** देशांत सौंदर्य स्थानें इतकीं आहेत कीं, कोणी त्याचा हिशेबच ठेवत नाहीं. जणूं काय निसर्गाच्या उधळेपणाबद्दल मनुष्य त्याला शिक्षा देत असावा. जसें बापूं (महात्माजी) बरोबर आश्रमांत अहर्निश राहण्याची आणि बोलण्याची संधी ज्यांना लाभली आहे त्यांना बापूंचें महत्त्व समजूं शकत नाहीं आणि ते बापूंना पुसतहि नाहींत, तसेंच आपल्या देशांत निसर्गाच्या भव्यतेच्या बाबतींत घडलें आहे.

आम्हीं **माणिकपूरहून झांशीला** जात होतों. वाटेंत 'हरपालपूर' आणि 'रोहा' यांच्यामध्यें अचानक एक विशाल सुंदर दृष्य दिसलें. तें सरोवर होतें कीं नदी हें सुद्धां समजत नव्हतें. आसपासचीं झाडें कांठाच्या इतकीं जवळ होतीं कीं, ही नदी असूंच शकणार नाहीं, असें अनुमान निघत होतें. सरोवराच्या चारी बाजू थोड्याफार उंच होत गेलेल्या असायला हव्या. येथें समोरच्या बाजूला एक उंच पर्वत आसमंतांतल्या जंगलास आशीर्वाद देत उभा होता आणि पाण्यांत पाहणाऱ्यांना आपलें उलटें दर्शन घडवीत होता. दाढी राखून डोकें तासणाऱ्या मुसलमानासारखें ह्या पर्वतानें आपल्या पायथ्याशीं जंगल वाढवून डोक्याची चप्पी केली होती. पुलाच्या डावीकडे पाण्याच्या विस्ताराच्या मधोमध एक लहानसें बेट होतें. दोन एक फूट लांब आणि एक हात रुंद व पाण्याच्या पृष्ठभागापासून फार नाहीं तरी चांगला सहा इंच उंच असा त्या बेटाचा डौल पाहण्यासारखा होता. जणुं काय शेजारच्या डोंगराला तें म्हणत

असावें कीं, "तूं किनाऱ्यावरून उभ्या उभ्या तमाशा पाहात आहेस. मी पहा कसा जलविहार करीत आहें. मधे पडलेला महासुख भोगतो; बघा हो. पाहणारा मात्र हारपळतो !"

तर मग ही नदी आहे कीं सरोवर? आतांच बेलाताल स्टेशन गेलें, तेव्हां ह्या प्रदेशांत ठिकठिकाणीं तलाव असावेत, परंतु खात्री होईना. डब्यांतल्या लोकांना विचारावें असें वाटलें; पण एकतर पॅसेंजर गाडी असूनहि दिवाळीचे दिवस असल्यामुळें स्थानिक प्रवासी नव्हते. आणि असले तरी त्यांच्या-कडून माहिती मिळेल याची आशा कशी करतां येईल ? पुष्कळ कालापासून जीवन–यात्रा विषम होत गेल्यामुळें जीवनांतील सारें काव्य कोरडें पडलें आहे. त्यामुळें जो प्रश्न विचारावा त्याचें उत्तर विषादमय बेदरकारीचेंच मिळायचें. लोकांचा चांगुलपणा अद्याप थोडासा उरला आहे; परंतु काव्य, उत्साह आणि कल्पनांचें उड्डाण हीं आतां स्मृतिशेषच राहिलीं आहेत.

परंतु, इतकें सुंदर दृश्य पाहिल्यावर विषादाचे विचार कसे राहणार? प्रवासांत नेहमी मी एक दोन नकाशे बरोबर बाळगतों. आधुनिक कालाचें भाग्य कीं असलीं साधनें सहज मिळूं शकतात. मी "रोड मॅप आव् इंडिया" (मोटार-वाल्यांचा नकाशा) काढून पाहिला. हरपालपूर आणि मऊरानीपूर यांच्या-मधून एक लांब नदी दक्षिणेकडून उत्तरेकडे वाहते व 'बेतवा' नदीला मिळते आणि तिच्या मदतीनें हिंमतपुरपाशीं आपलें पाणी यमुनेला अर्पण करते. 'परंतु ह्या नदीचें नांव काय ?' मी नकाशाला विचारलें. तो आळशी म्हणाला – 'पहा कोठें तरी लिहिलेलें असेल !' आणि खरोखरच त्याच क्षणीं नांव सांपडलें—'धसान'! इतक्या शहाण्या सुरत्या शांत पाण्याचें नांव 'धसान' कसें पडलें असावें ? हा त्याचा अपमान म्हणायचा ! नामाभिधानाच्या वेळीं जर मी असतों तर ह्या नदीचें नांव प्रसन्ना ठेवलें असतें, किंवा हिमालयाची माफी मागून तिला मंदाकिनी म्हटलें असतें.

परंतु, आपणांला काय माहित कीं, ज्या लोककवीनें ह्या नदीला 'धसान' नांव दिलें असेल, त्याला तिचें दर्शन कोणत्या ऋतूंत घडलें तें ! पावसाळ्याचा

अगदीं जोर आहे. आसपासचे डोंगर ढगांना पकडून पकडून जमीनदोस्त करीत आहेत आणि मस्ती करणारें पाणी हत्तीच्या वेगानें उत्तरेकडे धांवत आहे. शेजारच्या टेकड्या राहतील कीं वाहून जातील हें देखील समजत नाहीं. अशा-वेळीं लोककवीनें म्हटलें असेल, " पहा, ही धसान नदीची दंगामस्ती ! जणूं काय महाराजा पुलकेशीची सेना उत्तर दिग्विजयासाठीं निघाली आहे ! "

पण, ह्यावेळीं नदी इतकी शांत भासत होती कीं, जणूं काय गोकुळांत दंगामस्ती केल्यानंतर यशोदेपुढें गरीब गाय बनलेली आपली कृष्णाबाई ! असो.

सकाळीं उठून अचानक मिळालेली न्याहारी कोण सोडूं शकेल ?

**" मिष्टान्नं प्राप्य दुर्बुद्धे ! मा प्राणेषु दयां कुरु ।**
**मिष्टान्नं दुर्लभं मन्ये प्राणा जन्मनि जन्मनि ॥ "**

पोटभर खाल्ल्यावर स्नेह्यासोबत्यांचें स्मरण हें व्हावयाचेंच. आतां ह्या धसानचें मंगलदर्शन इष्टमित्रांना कसें करावयाचें ! स्वतःजवळ कॅमेरा नाहीं. आगगाडीमधून फोटो काढण्याची व्यवस्थाहि नाहीं आणि फोटो येऊन येणार तरी केवढा ? फोटोंत जर सारा आनंद समावूं शकला असता, तर भटकण्याचे श्रम कोणीच घेतले नसते. मी जर कवि असतों तर हें दृश्य पाहून हृदयाच्या उद्गारांची एक सरिताच फोफावली असती; पण तें भाग्यीं नाहीं माझ्या ! तेव्हां दुधाची तहान ताकावर भागवावी म्हणून हें पत्र लिहित आहें. भारता-विषयीं भक्तिभाव असणारा एकादा समानधर्मा झांशीहून पन्नास मैल आंत असलेल्या ह्या स्थळाचें दर्शन घ्यावयास अवश्य येईल.

—२—

धसानहून पुढें निघालों आणि ओरछा जवळ बेतवा नदी पाहिली. ही नदी सुद्धां बरीच रमणीय होती. तिच्या प्रवाहांत किती तरी खडक आणि झाडें होतीं. तिच्या लावण्यांत उणीव भासेल असें कांहीं नव्हतें. दूरदूर ओरछामधील मंदिरें आणि महाल दिसत होते. चिखलाचें कोठेंच नांव नाहीं. नदी पाहून आम्हीं झांशीला पोहोंचलों. तेथें श्री मैथिलीशरणांचे बंधु सियाराम-शरण आणि चारुशीलाशरण आपल्या परिवारांतील इतर मंडळीबरोबर

फराळाचें घेऊन आले होते. काव्यें वाचवाचून काव्यें निर्माण करणारे आपले कवि निसर्गाचें प्रत्यक्ष दर्शन हृदयापासून करीत नाहींत, अशी मला शंका होती. ह्या कवि-बंधूंनीं देखील **धसान** आणि **बेतवा**विषयीं कांहीं लिहिलें नसावें. म्हणून मी त्यांना स्पष्टपणें सांगितलें कीं "तुम्ही जर ह्या दोन नद्यांविषयीं कांहीं लिहिलें नसेल, तर तुम्ही निंदेस पात्र आहांत!" सियारामजींनीं आपल्या विनयानें मला पराभूत केलें. ते म्हणाले, "भैय्याजींनीं (मैथिलीशरणनीं) तर ह्या नदीचें वर्णन करतांना म्हटलें आहे कीं, सौंदर्याच्या बाबतींत बुंदेलखंडांतल्या ह्या नद्या गंगा-यमुनेपेक्षांहि वरचढ आहेत. तेव्हां माझ्या वडील बंधूंना तुमचा हा टोमणा लागू नाहीं. मी स्वतः ह्या नद्यांविषयीं लिहिलें नाहीं हें खरें आहे. परंतु मी वृद्ध झालों नाहीं ना ? मला तर अजूनहि पुष्कळ लिहावयाचें आहे."

**धसान**चें मूळ नांव दशार्ण होतें असें मला त्यांच्याकडून कळलें. आणि **बेतवा** म्हणजे **वेत्रवती** हें मला माहित होतें. दशार्ण=दशाअण=दशाण=धसान हा अपभ्रंश लक्षांत आल्यावर धसान नांवाविषयीं मी ज्या भलत्याच कल्पना केल्या होत्या, त्या ढेंकळाप्रमाणें विरघळून गेल्या. कांहींच पुरावा नसतां केवळ कल्पनांच्या आधारावर संशोधन करणारे माझ्यासारखे ह्या देशांत कितीतरी असतील. त्यांच्या चुका दाखविण्याइतकें ज्ञान असणारे लोक नसल्यामुळें अशा अगदीं कल्पनादेखील इतिहास म्हणून रूढ होतात. आणि कालांतरानें रूढींचे अभिमानी लोक कडवेपणानें ह्या कल्पनांना चिकटून राहूं पाहतात.

मीं एकदां वती-मती नांव असलेल्या नद्यांचीं नांवें एकत्र केलीं होतीं म्हणूनच वेत्रवती माझ्या लक्षांत राहिली. जिच्या कांठीं वेत उगवतो ती वेत्रवती. दृषद्वती ( दगड असलेली ), सरस्वती, गोमती, हाथमती, वाघमती, ऐरावती ( चंबळ ), भोगावती ( ? ), शरुवती इतक्या नद्यांचीं नांवें आतां आठवतात. अधिक शोधल्यास अजूनहि दोनचार सांपडतील. महाभारतांत जेथें तीर्थयात्रा प्रकरण आहे तेथें कांहीं नांवें एकत्र आढळतात. विश्वामित्र, बळराम, नारद, दत्तात्रेय, व्यास, वाल्मीकि, सूत शौनक आदि प्राचीन भूगोल-वेत्त्यांना विचारल्यास ते पुष्कळ नांवे सांगतील; किंवा जुळवून काढतील. आपल्या नद्यांच्या नांवांच्या मुळाशीं असलेली माहिती, कल्पना, काव्य आणि भक्ति ह्याविषयीं अद्याप कोणींच संशोधन केलेलें नाहीं; असें असतां भारतीय जीवन पुनः समृद्ध कसें बनावें ?

## देलवाड्याची धार्मिक कला * ४

### ( एक पत्र )

आपण देलवाड्याचे फोटो घेत आहांत हें ऐकून आनंद वाटला. प्रतिबिंबावरून फोटो घेण्याची कल्पना मजेदार आहे. फोटो पातळ फिल्मवर घेतलेला बरा. नाहींतर उलट येईल. कपड्यांची तऱ्हा त्यांत उलटी दिसेल. दोन आरशांचा उपयोग करून उलटें प्रतिबिंब सुलटें केल्यास चालण्यासारखें आहे; पण दोन आरसे पुष्कळसा प्रकाश खाऊन टाकतात. व त्यामुळें फोटो अंधुक निघतो. जेथें डाव्या–उजव्याचा प्रश्न नसेल, तेथें प्रतिबिंबाची युक्ति उत्तम आहे.

लाहोर म्युझिअमनें ' स्टोरी ऑव् बुद्ध इन् स्टोन ' नांवाचें एक लहानसें चोपडें प्रसिद्ध केलें आहे. बुद्धाच्या जीवनांतील निरनिराळ्या प्रसंगाचे कोरलेल्या शिल्पकामाचे नमुने जीवनक्रमानुसार त्यांत सांपडतात. **विजयानगर हम्पी** येथील एका देवळांत रामायणांतील प्रसंग अनुक्रमानें दाखविले आहेत. **देलवाडा** येथें ओसरीच्या छतावर कितीतरी पौराणिक प्रसंग कोरलेले आहेत. उभ्यानें पाहतां पाहतां मान दुखली, म्हणून जमीनीवर उताणा पडून सगळें पाहून घेतलें व मुलाप्रमाणें तसाच सरकत सगळी ओसरी पुरी केली. या सर्व चित्रांचे जर स्वस्त फोटो मिळूं शकतील, तर मुलांवर संस्कार करण्यासाठीं एक

* ' देलवाडा ' गुजरात आणि राजपुताना यांच्यामध्यं असलल्या अबूच्या पहाडांत आहे. तिथं जैन स्थापत्याची परिसीमा झाली असें म्हणतां येईल. प्रधान वस्तुपाल आणि सेनापती तेजपाल यांनीं ती बांधविली.

चांगली मित्रमंजुषा तयार होऊं शकेल. चित्रागणिक प्रसंगाचा आणि चित्रांचा परिचय दिला कीं पुरें! देलवाड्याच्या मंदिराचीं दोन शिखरें दोन प्रकारचीं आहेत. दुरून जर पाहिलें तर एकांत मर्दानी ओज ( हरक्यूलियन स्ट्रेंग्थ ) दिसतें, तर दुसऱ्यांत जनानी नाजुकपणा व लावण्य (Feminine Grace) आढळतें. तुमच्याहि लक्षांत हें आलेंच असेल. 'अबू' पर्वताचा सारा प्रदेश देवभूमीसारखा भासतो. **गुरुशिखरांचें** पवित्र आध्यात्मिक वातावरण, '**अचल गडचीं**' ऐतिहासिक संस्मरणें, देलवाड्याचीं श्रद्धाभक्ति, **अबुंदा** देवीची एकांत उपासना, **नखी** तलावाचें गंधर्व राज्य, त्याच्या आसपासची वन्यशोभा आणि वसिष्ठ आश्रमांकडील **तपोभूमि**—सारेंच कसें मोठें रमणीय आहे! अबू रोड स्टेशनपासून ज्या मोटारच्या रस्त्यानें आपण वर जातों, तो खरें पाहतां मागच्या बाजूचा रस्ता आहे. पुढच्या बाजूचा रस्ता नखी तलावाचें जास्तीचें पाणी ज्या दिशेला वाहतें, त्या दिशेला आहे.

अबूमध्यें मी खूप भटकलों आहें. तिथें मी खूप पाहिलें आहें. पाहतांना व भटकतांना भावना खूप उंचबळल्या आहेत! इतका भटकलों, इतकें पाहिलें कीं, तें सारें लिहूं म्हणेन तर थकून जाईन मी!

यावेळचें तुमचें पत्र नेहमींच्या पत्रांपेक्षां वैशिष्ट्यपूर्ण आहे. अबूमध्यें तुम्हांला विशेष आल्हाद आणि शांति मिळाली असें तुमच्या पत्रांवरून वाटतें. ती मंदिरें बांधणाऱ्याच्या भक्तीविषयीं तुम्हीं जें लिहिलें तें यथार्थ आहे. ताजमहालचें वातावरण निराळें व देलवाड्याचें निराळें. ताजमहालबद्दल माझ्या मनांत फार कदर आहे. अनेक प्रकारें मी त्याचें कौतुक केलें आहे.* परंतु त्याच्या मागची वेठ आणि जबरदस्तीची साम्राज्यसत्ता माझ्या मनांतून जात नाहीं. उलट देलवाड्याच्या सांघिक कलाकुसरीच्या मागें धर्मभाव व धर्म-प्रेम स्पष्ट दिसून येतें. ताजमहालमध्यें अमीरी साधेपणा आहे. देलवाड्यांत धर्मपरायणसंघाची बंधुभावना आणि सहकारमय स्वात्मार्पण—आत्मनिवेदनाचा

* '**आमच्या देशाचें दर्शन**' मधील '**प्रेमाचें अमरपुष्प**' हा लेख पहा.

उद्रेक विशेष आहे. ताजमहालच्या पाठीशीं एकट्या अद्‌भुत कलाधराची सृजनशक्ति दिसते तर देलवाड्यांत अनेक कलाधारांचा मधमाशासारखा एकराग प्रतीत होतो. **अजिंठ्यांत**हि हीच वस्तुस्थिति आहे. देलवाड्यांत साधन-संपत्ति जास्त आहे; पण अजिंठ्याचें सारें काम जणूं काय पूर्वाश्रमींच्या कला-धरांनीं स्वेच्छया आपली कलाशक्ति धर्मजीवनाच्या चरणीं अर्पण करण्यासाठीं वेचलेली असावी असें वाटतें. **वेरुळचें** वातावरण या दोहोंपेक्षां कांहीं अंशीं निराळें आहे. लोकोत्तर शक्ति आणि पराक्रम यांची प्रचीति तेथें येते. देल-वाड्यांत प्रत्येक कलाधरानें आपलें शक्तिसर्वस्व ओतण्याचा संकल्प केलेला दिसतो. कोणाला किती वेतन द्यावें व कोणी किती घ्यावें हा विचारहि त्यांच्या मनांत आलेला दिसत नाहीं.

महाराष्ट्रांत प्रचलित असलेली शिवाजी महाराजांविषयींची एक दंतकथा मीं लहानपणीं ऐकली होती. ती आहे दंतकथाच; पण तिच्यांत अद्‌भुत बोध भरला आहे. किल्ले बांधण्यासाठीं जमलेल्या कारागिरांना शिवाजी राजे रोज मजुरी म्हणून दर सायंकाळीं एकेक गवताची काडी स्वतः देत असत. ज्यानें दिवसभर आपलें चित्तसर्वस्व ओतून काम केलें असेल त्याची काडी रातोरात सोन्याची होई. ज्याची एकाग्रता नसेल त्याची चांदीची होई. सामान्य माणसाची तांब्याची आणि ज्यानें चित्तशाठ्य व श्रमशाठ्य केलें असेल त्याची काडी मात्र गवताचीच राही.

राजा सगळ्यांना सारखेंच देत होता. ज्यानें जितका आत्मा ओतला असेल तितकें त्याचें फळ आपोआप मिळे. अशा प्रकारच्या दंतकथा जन-मनाला समजूं शकेल अशा सोप्या रीतीनें सामाजिक धर्मबोध करीत असतात.

देलवाड्यांत धर्मप्रेम व्यक्त होतें तर, **गुरुशुक्रावर** प्रत्यक्ष धार्मिकताच अजूनहि स्फुरण पावते. एक सायंकाळ, एक संबंध रात्र आणि दुसऱ्या दिवशींची सकाळ जर गुरुशुक्रावर घालवाल तर त्याचा प्रत्यक्ष अनुभव तुम्हांला येईल. पण तेथील साधू आणि त्यांच्या गोष्टी मात्र विसरल्या पाहिजेत. देलवाड्याची मंदिरें बांधलीं जाण्यापूर्वी अनेक जैन साधूंनीं गुरुशुक्रावर तप केलें असावें

असें मला वाटतें. अचलगडाकडील गोपीचंदाची गुहा तुम्ही पाहिली काय ? बैरागी राजाचें तें स्थान पाहण्यासारखें आहे.

देलवाड्याच्या भद्राकृतीकडे माझें लक्ष वेधलें गेलें होतें. कांहीं सोप्या आकृति मी कागदांवर काढूनहि घेतल्या होत्या; पण अमदाबाद ते अबू आणि अबू ते अमदाबाद हा प्रवास मीं पायीं केला होता. कपडे रोज हातानें धूत असे. एक दिवस कपड्याबरोबर तो कागदहि धुतला गेला व कागदावरच्या त्या कलाकृति पुसल्या गेल्या. मीं कागदांवर केवळ कल्पनाच काढल्या होत्या. अनेक नियमांपैकीं ‘प्रत्येक मुलाला ड्राइंग आलेंच पाहिजे’ असाहि एक नियम आमच्या लहानपणीं असता तर किती बरें झालें असतें. एकादें सुंदर दृश्य आज मी जेव्हां पाहतों, तेव्हां माझें हृदय व्यथित होतें; कारण मनाजोगें असें कांहींच काढतां येत नाहीं मला !

---

दृष्य वाटेल तितकें सुंदर असो 'अतिपरिचयादवज्ञा' या न्यायानें त्यांतलें सगळें वैशिष्ठ्य हळुहळु नाहींसें होत जातें. दोन वर्षांपूर्वी मी लिहिलें होतें कीं मुंबई-पुण्याच्या रस्त्यावर जो खंडाळ्याचा घाट आहे त्याची भव्यता मोठमोठ्या कवींना, चित्रकारांना गिरिप्रवासी परिव्राजकांना मोहित करून टाकेल अशी आहे. पण ह्या घाटांतून आगगाड्या दररोज सातआठ वेळां ये जा करीत असल्यामुळें लोकांना आजकाल त्याचें कांहीं वाटेनासें झालें आहे. आपल्या हातून ह्या विश्वरुपदर्शनाची अवज्ञा होत आहे हें देखील या प्रवाशांच्या मनांत येत नाहीं. निसर्गाविषयीं अलिप्त, अनासक्त भाव बाळगून ही मंडळी बाहेरचें सौंदर्य पाहण्याच्या ऐवजीं विड्या फुंकतात, गप्पा मारतात किंवा केक बिस्कीट, चिवडा फांकतात. तें पाहून कशी चीड येते व वाटतें कीं, एकेकाला उचलावें आणि या पर्वताच्या पायथ्याशीं फेंकून द्यावें. जरा बाहेर डोळा करून त्या विशाल दृष्याचें जर मनुष्यानें पान केलें, तर त्याला काय अपचन होईल ? कीं डोळे थकतील त्याचे ? कीं दृष्टि मंद होईल ?

तथापि त्यांच्यावर चिडण्यापूर्वी मी नको कां विचार करायला कीं एवढें अनंत आकाश माझ्या डोक्यावर पसरलेलें आहे त्याचें मी कोठें गद् गद् होऊन सजल नेत्राने दर्शन करतों ? परिचयाने औत्सुक्य लोपलें म्हणजे त्या वस्तूचा वियोग घडल्यानेंच मग तिचें रुप, लावण्य अथवा तिचा गुणसमुच्चय आठवतो.

दिल्लीस गेलों म्हणजे मोंगल वैभवाचे अवशेष पहावयाचें मन होतेंच. नुकतेंच तेथें मध्यआशियांतून लुटून आणलेल्या चित्रांचें एक म्यूझियम

बांधण्यांत आलें आहे. त्यामुळें दिल्लींतील अनेक आकर्षणांत आणखी एकाची भर पडली आहे.

आतां या सगळ्या वस्तु माणूस दिल्लीला गेला म्हणजे वाटेल तेव्हां पाहूं शकतो; पण कुतुबमिनाराचें तसें नाहीं. तो थोडा दूर आहे. थोडाच कां, दिल्लीपासून चांगला बारा, पंधरा मैल दूर आहे. म्हणून तेथें सहज जाणें जमत नाहीं. कुतुबचें सौंदर्य, त्याचा इतिहास, त्याच्या संबंधीच्या पृथ्वीराजाच्या काळापर्यंत जाऊन भिडलेल्या दंतकथा, सगळेंच कांहीं आकर्षक आहे. पण बिचारा कुतुबदेखील अतिपरिचयाची शिकार झाला आहे. त्याचेविषयीं अधिक संशोधन करण्याचें आतां उरलें नाहीं. गाईडबुकांतून त्याच्या संबंधीची सर्व माहिती पद्धतशीर छापलेली मिळते. मिनार मुसलमानानें बांधला कीं हिंदूच्या एखाद्या कीर्तिस्तंभाला सोलून काढून मुसलमानांनीं त्याची 'तबलीग' केली या संबंधीची सगळी चर्चा एकाद्या हिंदी मासिकांतून वाचायला मिळूं शकेल. कॅमेरा घेऊन त्याची छायाचित्रें काढण्याचाहि फारसा हुरूप आपल्याला वाटत नाहीं. कारण, त्याच्या सगळ्या बाजूचे अनेक फोटो काढण्यांत आलेले आहेत. इतकेंच नाहीं तर, ते प्रत्यही तुमच्यापुढें जाहिराती-प्रमाणें मांडले जात आहेत. इतकें सगळें झाल्यावर आपल्या मनांत कुतुब-विषयीं कुतूहल किंवा काव्यभाव निर्माण व्हावे तरी कसे ?

तरीदेखील कुतुब तो कुतुबच ! तो कांहीं मुंबईचा राजाबाई टॉवर नव्हें कीं पाहिला एकवार नि भरलें पोट ! कुतुबच्या जवळ जर मुंबईसारखा एकादा समुद्र असता तर कुतुबने किती उन्माद निर्माण केला असतां कोण जाणे ! मीं कुतुबचें अनेकवार दर्शन घेतलें आहे. त्याच्याच शेजारी आपली प्रतिष्ठा संभा-ळून उभा असलेला प्राचीन लोहस्तंभहि तितक्याच वेळां पाहिला आहे. इतकेंच नव्हे तर स्तंभाकडे पाठ करून त्याला उलट्या बाहुपाशांत धट्ट धर-ण्याचाहि प्रयत्न केला आहे. कारण तेथल्या त्या स्थानमाहात्म्याचा अनादर कसा बरें करावा ?

पण आतां मी जो कुतुबच्या दर्शनाला जातों तों कांहीं कुतुबचें सौंदर्य

बघण्यासाठीं नाहीं. इतका हा सुंदर मिनार ! हा कसा बांधला असेल ? कोणी बांधला असेल ? बांधणारांनीं किती दिवस त्याचें ध्यान धरलें असेल ? त्याच्या कारागिरींतील मुख्य स्थपित कोण ? तो हिंदु होता कीं हिंदुस्थानचा होता कीं कोणी परदेशी होता ? ह्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मी शोधीत बसत नाहीं. भूकंपामुळें जो त्याचा मुकुट कोसळला त्याचें कल्पनाचित्रहि मी आतां रंगवीत नाहीं. एका इंग्रज ‘ लोहारा ’ नें ( एंजिनियर ) त्याच्या डोक्यावर एक टोप चढविला होता तो आतां लॉर्ड हार्डिजनें खालीं उतरवून ठेवलेला आहे. तो मिनारावरून दिसत असतांहि, तो जेव्हां कुतुबच्या डोक्यावर होता तेव्हां तो शोभून दिसत होता किंवा नाहीं या कल्पनेसाठीं मी आतां शिणत नाहीं. त्याला खालीं उतरविण्याची आज्ञा देतांना व्हाईसराय मजकुराच्या मनांत त्या वेळीं काय विचार उठले असतील हेंहि हल्लीं माझ्या मनांत येत नाहीं. कुतुबवर चढतांना किंवा खालीं उतरतांना त्याच्या ३७८ पायऱ्या ज्या मी मोजतों त्यादेखील केवळ सवयींमुळेंच !

कुतुबच्या ज्या पायऱ्या मी चढतों त्याचा उद्देश निराळाच असतो. मिनाराच्या आसमंतांत सागराच्या लाटा उफाळत नाहींत हें खरें. पण पांडव-काळापासून गांधी—इर्विन—करारापर्यंतच्या इतिहासाच्या लाटा आपल्या स्मृति-सागरांत उसळतात व हृदयांत कल्लोळ करून अस्वस्थ करून टाकतात. हा अस्वस्थ करणारा अनुभव घेण्यासाठींच मी वर चढतों.

कुतुबवरून दिल्ली दूर दिसत असते. दिल्ली नेहमीं दूरच असते, आणि ती दूर रहावी यांत वाईट तें काय ? माझ्या कल्पनाचक्षूंनीं मी जेव्हां जेव्हां कुतुबवरून दिल्लीकडे पाहतों तेव्हां स्मशानभूमींत उगवलेल्या एकाद्या सुंदर, सुबक फुलासारखी मला ती भासते. नाश, विनाश, संहार, मृत्यू , विस्मृति, विषाद, परिताप हे सर्व दूरपर्यंत पसरलेले असावेत आणि त्यांतून केवळ वैराग्याचीच धारा फुटत असावी असें तें दिल्लीच्या आसपासचें दृष्य आहे. येथें जे कोणी आले ते सर्व गेले. लहानसान जमीनदारहि नष्ट झाले आणि मोठमोठे सम्राटहि विलयाला गेले. आपली कीर्ति अजरामर करण्यासाठीं लोकांनीं कठिण

पाषाण रचरचून भव्य आणि उत्तुंग कीर्तिस्तंभ उभविले आणि त्या सगळ्यांचीं आतां खिंडारें होऊन पडलीं आहेत. कोणी कोणास विचारीत नाहीं. कोणी कोणास ओळखत नाहीं !

पानिपतला महान् सेनांची स्मशानभूमि जर म्हटलें तर दिल्लीच्या आसपासचा प्रदेश सम्राज्यांच्या स्मारकांची स्मशानभूमि म्हटला पाहिजे. अशा या स्मशान-भूमीच्या वातावरणांतसुद्धां भोगविलासांत मग्न राहणाऱ्या आणि क्षुद्र महत्वा-कांक्षेपायीं पागल होणाऱ्या मानवसमाजाचें सुंदर वसतिस्थान म्हणजे ही दिल्ली! जणूं जख्खड म्हाताऱ्यांच्या कृश अंकावर खेळत असलेलें एकादें बालकच !

मुंबई, कलकत्ता किंवा मद्रासच्या मानानें दिल्ली कांहीं मोठें शहर नव्हे, पण दिल्ली तिच्या योग्य वातावरणांत पाहावयाची असते. आणि म्हणून तिच्या खिंडारांच्या आसपासच्या वातावरणांत ती कशी दिसते हें पाहिलें पाहिजे. त्या दृष्टीनें कुतुबमिनार मोठा मदतनीस आहे. विशाल भूतकालांत वर्तमान किती क्षणजीवि आहे याची कल्पनाहि कुतुबमिनारच देऊं शकेल. आजचा हा खटाटोप, हें वैभव, सगळें जुन्याच रस्त्यानें जायचें आहे हा विचार येतांच प्रेम आणि कौतुकाबरोबरच मनांत विषाद भरून येतो आणि चित्तवृत्ति सहजच भर्तृहरि किंवा उमरखय्याम यांना शरण जाते.

---

निसर्ग आणि परमेश्वर दोघांनाहि कंजुषपणा कसा तो ठाऊकच नसतो. त्यांना दहा मागण्याला जावें तेथें शंभरच दिले जातात. मीं निघालों होतों बद्रीनारायणाची यात्रा करण्याचा संकल्प करून व त्यांत भर पडली गंगोत्री जम्नोत्रीची !

आम्हीं जम्नोत्रीहून परत येत होतों. चार वाजतां एका खेड्यांत एक सुंदर झरा आणि आतिथ्यशील वृक्ष दिसला. तेथेंच मुक्काम ठोकण्याचें आम्हीं ठरविलें. झऱ्याच्या कांठीं बसून त्याच्या तालांत ताल मिळवीत आम्हीं सायंप्रार्थना केली. स्वयंपाक करून जेवलों आणि जवळच्या एका पर्णमंडपांत रात्रीची झोप काढली. तेथें दोघां साधूंची भेट झाली. एकजण वृद्धासन मांडून बसला होता आणि दुसरा आपल्या पावडीच्या आधारानें. साधूंची गांठ पडली म्हणजे यात्रेच्या गोष्टीखेरीज दुसरें काय सुचायचें ? मीं आपल्या यात्रांचें वर्णन केलें. त्यांनीं आपल्या. आणि वृद्धासन घातलेले साधु म्हणाले,

"बेटा, अमरनाथ हो आये हो ?"

"ना. जी." मी म्हटलें.

तेव्हां त्या साधूनें काश्मीरच्या हिममय पर्वतांतलें अमरनाथ किती दूर आहे, तेथल्या एका गुहेच्या कोनाड्यांत बर्फाचे स्वयंभू लिंग कसें निर्माण होतें याचें वर्णन केलें. अमावास्येला तें लिंग वितळून जातें व पौर्णिमेला खूप मोठें होतें.

" भगवान की लीलाका पार किसने जाना है ?"

मीं म्हटलें—“ सत् बचन ”

त्यानंतर साधूनें किती तरी गोष्टी सांगितल्या; पण माझें मन त्या शिव-लिंगाचें मानसिक दर्शन करण्यांतच मग्न झालें होतें. उत्तरखंडाची यात्रा संपवून मी तावडतोब काश्मीरला जायला निघालों. वाटेंत कांहीं विद्यार्थ्यांचा आग्रह पडला म्हणून एक दिवस लाहोरला थांबलों. विद्यार्थी मेडिकल कॉलेजचे. ते सुटाबुटांत मिरवत होते. आणि मी आपला एक धोतर आणि अंगावर एक पंचा असा.

त्यांनीं मला विचारलें, “ तुम्ही संस्कारी कपडे कां घालीत नाहीं ?”

हंसत हंसत मी उत्तरलों, “शिंप्याच्या दयेनें संस्कारी बनण्याची माझी इच्छा नाहीं. आज जगांत लोकांना संस्कारी बनविण्याचें काम शिंप्याच्या हातीं आहे. ‘टेलरमेड सिविलिझेशन’ ला मी कंटाळलों आहें.”

जेष्ठ–आषाढाचे दिवस होते. लाहोरचा उन्हाळा असह्य वाटत होता तरीहि ते लोक शर्ट, जाकिट आणि कोट घालून व पायांत मोजे बूट घालून मिरवत होते.

रावळपिंडीला आम्ही आगगाडीची रजा घेतली आणि शहरांत प्रवेश केला. शहराबाहेर ‘तपोवन’ म्हणून एक सुंदर उपवन आहे. साधुलोक तेथें राहतात असें समजलें. नांव ऐकून तपोवनीं जाण्याची मनाला ओढ लागली. दहावीस साधु तेथें राहत होते. दरवाज्यापाशींच एक लांब व मोठी शिखा असलेला शीख मोठ्या शिलेवर भांग घोटत होता. आमचें सामान धर्मशाळेंत टाकून आम्ही आंघोळीला गेलों. विहिरीचें थारोळें खूप उंच होतें आणि थारोळ्या-समोरच अशा प्रकारच्या कुंडाची योजना केली होती कीं, त्यांत बसून आंघोळ करणाऱ्याच्या डोक्यावर पाण्याची अर्धचंद्राकार धार पडावी. माझें स्नान संपतें न संपतें तोंच तो साधु माझ्यासाठीं एक ग्लास भरून थंडाई घेऊन आला. ‘बहोत अच्छी है, मीठी है, लीजिये भगवन्।’ म्हणत तो मला थंडाईचा आग्रह करूं लागला. त्याचें तें ढेरपोट, त्याच्यावर उठून दिसणारी दाढी, हातांत थंडाईचे ग्लास आणि डोक्याच्या केसांत खोवलेली कंघी अशी त्याची मूर्ति

अजून माझ्यासमोर उभी राहते. मी नम्रतापूर्वक म्हटलें, "मुझे माफ कीजिये, मै भांग को छूता नहीं हूं और चीनीभी नहीं खाता हूं।" बिचारा साधु इतक्या मेहनतीनें बदाम, वेलची, धने आणि साखर टाकून बनविलेली भांगेची थंडाई घेऊन माझें आदरातिथ्य करायला आला. मी नको म्हणेन याची त्याला कल्पनाहि नसावी. हातांत गोड थंडाई असूनदेखील त्याचें तोंड आंबट झालें. अखेर त्याच्याकडे जेवण्याचें कबूल करून त्याचें समाधान केलें व आपले नित्यक्रम संपविले. परंतु साधूला दिलेलें जेवणाचें वचनहि मी पाळूं शकलों नाहीं. भगत ईश्वरदास नांवाचे एक वकील तेथें आले होते. त्यांच्याबरोबर राष्ट्रीय शिक्षणाबाबत चर्चा करण्यासाठीं त्यांच्या घरीं गेलों आणि तेथेंच जेवलों. दुसऱ्या दिवशीं आमच्या यात्रेला वास्तविक प्रारंभ झाला. सारें सामान मी पाठुंगळीला बांधलें आणि रस्ता विचारीत विचारीत पुढें निघालों.

ह्या प्रदेशांत शीख लोकांची खूब वस्ती आहे. शीखांत साधूविषयीं विशेष आदर दिसून येतो. दुपारीं आम्हीं शीख धर्मशाळेंत जाऊन पोंचलों. धर्मशाळा म्हणजे ग्रंथसाहेबाच्या पूजेचें मंदिर. मंदिरांत रेशमाच्या कपड्यांत बांधलेला मोठा ग्रंथसाहेब असतो. त्याच्यावर माती पडूं नये म्हणून वर मोठा रेशमी चांदवा बांधलेला असतो. मोठें चामर घेऊन ग्रंथ साफ करण्यांत येतो. एखादा भक्त आला म्हणजे दक्षिणा देतो आणि ग्रंथी (ग्रंथसाहेबाची व्यवस्था ठेवणारा पुजारी म्हटल्यास चालेल) ग्रंथसाहेबांतून जीं कांहीं वचनें वाचून दाखवील ती भक्तिपूर्वक ऐकतो. आपल्या मंदिरांत दक्षिणेच्या मोबदल्यांत चरणामृताचा आस्वाद मिळतो. शीख मंदिरांत भक्तीनें ओथंबलेलीं दोन-चार वचनामृतें ऐकायला मिळतात. आणि पूजेच्या वेळीं गेलांत तर *'कणासाहेब' हि मिळतो.

एका धर्मशाळेंत पोंचलों. तोंच ग्रंथीचा मुलगा गरम पाण्याचा लोटा

* कणासाहेब म्हणजे प्रसादाचा शीरा.

घेऊन धावत आला आणि माझे पाय धुवूं लागला. मीं किती नको म्हटलें, परंतु त्यानें आपलाच हट्ट चालविला. धर्मशाळेंतूनच मला भाकर मिळाली असती; परंतु माझ्याबरोबर अनंतबुवा होते. ते तर कर्मठ दक्षिणी ब्राह्मण. त्यांना पंजाबी रोटी कशी चालायची ! म्हणून ग्रंथीसाहेब बुवाबरोबर पांच दुकांनीं भिक्षा मागायला तयार झाले. त्या प्रदेशांत हा एक विशेष रिवाज आहे. धर्मशाळेंत साधू येऊन राहिला म्हणजे त्यानें भिक्षेसाठीं कोठें जावें तें हे ग्रंथी सोबत येऊन दाखवतात. गांवांतील सगळ्या लोकांवर सारखाच भार पडावा अशाप्रकारें ग्रंथी व्यवस्था करीत असतात. आणि त्यामुळें साधूनांहि घरोघर हिंडण्याच्या रखडपट्टींतून मुक्तता मिळतें. वीस-पंचवीस मैल चालून आलेल्या साधूंच्या दृष्टीनें ही कांहीं कमी सोईची व्यवस्था नाहीं.

दुसऱ्या दिवशीं आम्ही ‘कुमरी’ किंवा ‘मरी’ नामक एका सुंदर व रमणीय अशा डोंगरी शहरांत येऊन पोंचलों. मरी हें युरोपीयन शहर आहे. रस्ते वरखालीं व नागमोडी असल्यामुळें प्रत्येक रस्त्याचें दृश्य म्हणजे एक एक स्वतंत्र काव्यच. आसपासच्या टेंकड्यावरील चिंच व देवदाराचे वृक्ष, आकाशांत इकडे तिकडे बागडणाऱ्या रंगीबेरंगी मेघपंक्ति आणि त्यांना पकडण्यासाठीं दूरपर्यंत जाऊन पोंचणारे सूर्यकिरण हेंच ह्या ठिकाणचें वैशिष्ट्य आहे.

‘मरी’त एक फारच सोय दिसून आली. गाडीरस्ता शहराला येऊन मिळतो तेथें काचेच्या चौकटींत बसविलेला मरीचा नकाशा होता. त्यांत मरीचे रस्ते, मोठमोठे बंगले, टपालघर, तारघर, दवाखाना वगैरे सार्वजनिक ठिकाणें, सगळें कांहीं दाखविलें होतें. प्रत्येक बंगल्याचें नांव स्वतंत्र असल्यामुळें लोकांच्या व डाकेच्या दृष्टीनें तें फारच सोयीचें होतें. मला ‘काश्मीर हाऊस’ मध्यें जायचें होतें. नकाशांत रस्ता पाहिला व अचूक तो बंगला शोधून काढला. सूर्यास्ताच्या वेळीं खास पाहण्याजोगे पॉइण्ट् देखील मी भटकून आलों. रात्रीं माझ्या यजमानांनीं शीख लोकांच्या नित्य पाठाच्या ‘सुखमणी’तून सुंदर सुंदर भाग वाचून दाखविला. उलट, मी त्यांना तुकारामाचे अभंग म्हणून दाखविले.

दोघांनींहि आनंद लुटला. रात्रींच्या जेवणांत पांच दहा प्रकारचें लोणचें वाढलेलें पाहून मी गोंधळलों. पंजाबी लोक जवळजवळ दरेक भाजीचें व फळाचें लोणचें घालतात. वांगी, मुळे, अंजीर, सफरचंद, खारीक, गाजर सर्वांचेंच लोणचें !

दुसऱ्या दिवशीं आम्ही डोंगर उतरूं लागलों. वाटेंत लागलेल्या फौजेच्या तंबूंच्या रांगा पार करून आम्ही पुढें गेलों आणि 'कोहाळा' पुलावर येऊन पोंचलों. हा पूल ओलांडला कीं, आपली खरी काश्मिरची यात्रा सुरूं झाली असें वाटतें. एकीकडे उंच पर्वत तर दुसरीकडे खोल दरी आणि दरींतून खळखळत जाणारी नदी. पुष्कळ ठिकाणीं तर नदीकांठचे मोठें खडक फोडून रस्ता बनविण्यांत आलेला आहे.

त्या दिवशीं दुपारीं माझ्यावर एक मोठीच आपत्ति कोसळली. दोनाचा सुमार असावा. तहान खूप लागली होती. जवळपास पाणी तर कोठेंच दिसेना. इतक्यांत एका दरींतून थंडगार वारा आला. मला वाटलें तेथें एकादा जलाशय अवश्य असला पाहिजे. माझे पाय त्या दिशेला वळले. बुवांना तहान लागली नव्हती, म्हणून ते रस्त्यावरच थांबले. रस्ता सोडून मी जंगलांत शिरलों. पाहतों तर डोंगरांतून वाहणारा एक सुंदर झरा. जवळच दगडांची एक मेर घातलेली होती व त्याच्यावर एक मोठी दगडी फरशी ठेवलेली होती. झऱ्याच्या जवळ घाण होऊं नये म्हणून मी त्या शिळेच्या कोपऱ्यावर बसून लघुशंका केली. इतक्यांत एक धिप्पाड मुसलमान तरुण तेथें आला. त्याच्या हातांत परशुरामाप्रमाणें कुऱ्हाड होती. मला पाहून त्याचा पारा चढला आणि रागानें तो म्हणाला—

'आमच्या नमाज पडण्याच्या जागेवर लघुशंका करतोस ! लाज नाहीं वाटत ! तुमच्या धर्मशाळेंत ( म्हणजे शीख मंदिरांत तो मला शीख समजला होता. ) जर आम्ही लघुशंका केली तर तें तुम्हांला सहन होईल काय !'

त्या क्रुद्ध माणसाला शांत करण्याइतकी हिंदी भाषा त्यावेळीं मला येत नव्हती व त्या निर्जन जगलांत एका धर्मवेड्या मुसलमानाशीं गांठ पडलेली ! मनांत

भय वाटलें; पण दुसऱ्याच क्षणीं विचार आला कीं, साधूच्या वेषानें हिंडणाराला भीति शोभत नाहीं. त्यानें उगारलेली कुऱ्हाड पाहून मी हळुंच त्याच्यासमोर जाऊन उभा राहिलों. माझी शांतवृत्ति पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्याची कल्पना असावी कीं मी पळून जाईन किंवा त्याच्याशीं दोन हात करायला सज्ज होईन. पळून जावें असें जरी मनांत आलें असतें, तरी जंगलांत जाणार कोठें ? परतण्याच्या मार्गावर तर ती मूर्ति उभी ! सामना देणें किंवा पलायन करणें यापैकीं मी कांहीं केलें नाहीं ह्याचा त्याला विस्मय वाटला.

उगारलेला हात त्यानें खालीं घेतला. परंतु पूर्वीच्याच क्रोधानें म्हटलें, "मी तुला आतां येथून जिवंत जाऊं देत नाहीं."

मी म्हटलें, "त्यांत तुझा काय फायदा होणार ? एक साधु जगांतून नाहींसा होईल ! मी कांहीं तुमच्या प्रांतांतला नाहीं आणि जाणून बुजून त्या स्थानाचा अपमानहि मी केलेला नाहीं. नमाज पढण्याची जागा असेल तर भल्या माणसा, तिच्या चारीबाजूस तुम्ही कुंपण करायला पाहिजे होतें !"

माझें म्हणणें त्याला किती पटलें तें त्याचा खुदा जाणें. परंतु, तो थोडा नरमला. तो म्हणाला—

"बरें झालें मींच तुला पाहिलें. दुसरा कोणी असता तर त्यानें जीवानिशीं सोडलेंच नसतें. पळ आतां येथून."

"असाच जाणार नाहीं. मला एकादें भांडें देशील तर पाणी आणून ह्या दगड धुवून टाकतों."

माझी ही धर्मनिष्ठा पाहून तर तो अगदींच मऊ आला. त्यानें एक मडकें दिलें. मी शक्य तितकी श्रद्धा दाखवून झऱ्याच्या पाण्यानें ती शिला धुवून टाकली. आणि त्या पाक मुसलमानाचें कौतुक करीत तेथून परतलों. त्या मनुष्याला इतका क्रोध आला होता, तरी त्याच्या तोंडून अपशब्द निघाला नाहीं. अथवा त्यानें शिव्या दिल्या असल्या तरी त्या मला समजल्या नसाव्यात. असो, पाणी प्यालों आणि बुवांना जाऊन मिळालों व वितस्था ( झेलम ) नदीचें जलमंथन ऐकत ऐकत पुढें कूच करते झालों.

दुसऱ्या दिवशीं खूप पाऊस पडला. आपल्या जीवनांतील एक अपूर्व अनुभव त्या दिवशीं मला आला. गाडी—रस्ता वळणें वळणें घेत जात असल्या-मुळें मधली पायवाट पकडावीशी वाटली. मधल्या वाटेनें मोठा चक्कर वांचविता येत होता. बुवा व मी गोष्टी बोलत चाललों होतों. आदर्श खाणावळ कशी असावी त्याविषयीं आमच्यांत बोलणें चालूं होतें. मी म्हटलें, "मनुष्य जितकें खाईल तितक्याचेंच पैसे देण्याची 'प्लेट सिस्टिम' मला पसंत आहे."

"यांत तुमचा तो कटु व्यक्तिवाद आहे. खाणावळींत एकाच प्रकारचें भोजन असावें व जो तीन आणे देईल त्याला पोटभर खायला मिळावें, हीच पद्धत चांगली आहे. ह्या पद्धतीमुळें गरीबांना साधें अन्न मिळेल, परंतु पोटापुरतें मिळेल! तुमच्यासारख्या कमी खाणाऱ्या माणसांना तीन आणे वसूल करायला अडचण पडेल खरी, परंतु सामाजिक कल्याण यांतच आहे. तुमची प्लेट सिस्टिम सुरूं करायची म्हटली तर पुष्कळ लोकांना अर्धपोटीं रहावें लागेल."

मी आपल्या व्यक्तिवादाचा बचाव करायला जात होतों, इतक्यांत माझ्या पायाखालची माती एकदम कोसळली आणि मी गडगडून अनेक दगडांशीं टकरा खात खात टेंकडीवरून खालीं कोसळलों! वाटेंत कांटेरी झुडुपें पुष्कळच होतीं. माझ्या दोन्हीं हातांत दोन छत्र्या होत्या. त्यांचा आधार घेण्याचा मी बराच प्रयत्न केला, पण व्यर्थ!

उभ्या टेंकडीची एक संबंध कडा कोसळून पडली होती. अशा प्रकारचे 'लॅण्डस्लिप' इकडील प्रदेशांत पुष्कळच होतात. इकडील टेंकड्या खडकाळ नसतात. माती व गोल गोल दगड यांच्या त्या बनलेल्या असतात. पाऊस पडला कीं माती सुटते व दगडाचा भार तोलूं शकली नाहीं कीं 'लॅण्डस्लिप' होतात. पुष्कळ लोक अशा 'लॅण्डस्लिप' खालीं दबून प्राणास मुकतात. कधीं कधीं गाड्या व मोटारी देखील त्यांच्या सपाट्यांत सांपडून चक्काचूर होतात.

मी टेंकडीच्या माथ्यावर होतों म्हणूनच दबलों किंवा मेलों नाहीं. बुवा तर मला पडतांना पाहून दिङ्मूढ होऊन गेले होते. त्यांना कांहींच सुचलें नाहीं. अशाप्रकारें सुमारें पाऊणशें फूट खालीं घसरतांना मला पाहून काय

करावें हें ठरविण्याच्या आधींच मी अगदीं पायथा गाठला होता ! झुडपांच्या काट्यांचे ओरखाडे शरीरभर निघाले होते. परंतु, मला फारसें लागलें नाहीं. रस्त्यावर माती व दगडांच्या ढिगावर बुवांनीं जेव्हां मला पाहिलें, तेव्हां त्यांच्या जीवांत जीव आला. आणि मग ते रडूं लागले ! खाणावळीच्या गोष्टी तिथल्या तेथेंच राहिल्या आणि बाकीचा सगळा दिवस तोंडांतून बिलकुल शब्द न काढतां अगदीं मुकाट्यानें आम्ही आमचा मार्ग आक्रमिला.

'लॅण्डस्लिप'चा आणखी एक प्रसंग येथें सांगून टाकणें अप्रस्तुत होणार नाहीं. ह्या काश्मीरच्या रस्त्यानेंच आम्ही एक दिवस चाललों होतों. झिमझिम पाऊस पडत होता. इतक्यांत उजवीकडे 'फड फड फड' असा आवाज आला. जुन्या आवाजावरून मी चटकन् ओळखलें कीं, 'लॅण्डस्लिप' होत आहे. आम्ही रस्त्यावर होतों. पुढें पळत जाण्यांत सुरक्षितता आहे कीं मागें पाऊल घेण्यांत, ह्याचा निर्णय करणें कठिण होतें. म्हणून आम्ही दोघे ज्या ठिकाणीं उभे होतों, तेथेंच उभे राहिलों. उभें राहण्याचा असा कांहीं आम्ही निश्चय केलेला नव्हता. परंतु पायच उचलेनात. इतक्यांत वरून मडक्याइतके मोठे दोन दगड कोसळत कोसळत रस्त्यावर येऊन पडले. एक माझ्या मागें पडला व दुसरा समोर ! थोडे जरी शहाणपणा दाखवायला गेलों असतों तर दोहोंपैकीं एका दगडाच्या टप्प्यांत येण्याचें नशिबीं आलें असतें. परंतु, आमच्या नशिबाची रेषा त्या दगडांच्या रेषेंत बसणारी नव्हती.

पुढच्या प्रवासांत आम्हाला चारपांच संन्यासी भेटले, पण त्यामुळें माझें दुःख वाढलें. बुवांचा मात्र भार हलका झाला. ह्यानंतरच्या मुक्कामांत बुवा आपल्यापुरतीच भिक्षा मागून पीठ आणीत आणि स्वतःपुरता स्वयंपाक करून जेवीत. मला त्या साधूंबरोबर स्थानिक लोकांचा पाहुणचार स्वीकारावा लागे. पंजाबी लोक रोट्या फारच चांगल्या बनवतात. जाड असल्या तरी नरम असतात. परंतु, तोंडी लावायला नेहमीं कांदे-बटाट्यांची भाजी. मला लहानपणापासून कांद्याविषयीं तिटकारा आणि शिवाय साधू कांदे खाऊं शकत नाहींत अशी माझी भावना. आणि इकडे तर सगळ्या साधु-संन्याशांना

कांद्याच्याच भाजीची आवड अधिक! मला कांदा चालत नाहीं अशी आपल्या यजमानांना सूचना करावी तर माझे सोबती नाराज होणार; आणि सूचना न करावी तर निभाव लागणें कठिण! निराळा स्वयंपाक करायचा तर तें शोभेल का? दुसऱ्या घरीं जावें तर तेंहि अयोग्य. शेवटीं मीं ठरविलें कीं, भाजींतले कांद्याचे तुकडे काढून बाजूच्या साधूला द्यावे आणि आपण बटाटे बटाटे तेवढे खावे. एवढ्यानें आपला कर्मठ धर्म पाळला जातो असें मीं आपल्या मनाचें समाधान करून घेत असे!

आमच्यापैकीं एक संन्यासी शाक्त होता. तो रोज सप्तशतीचा पाठ करीत असे. सप्तशतींत ज्या प्रार्थना आहेत, त्यांतील एक ओळ अशी आहे—

"भार्याम् मनोरमाम् देही मनोवृत्तानुसारिणीम्."

'भगवन्! आपल्या तोंडी अशी प्रार्थना!' मी त्याला विचारलें.

त्या दिवसापर्यंत त्या बिचाऱ्यानें त्या पंक्तीच्या अर्थाचा विचारदेखील केला नव्हता; परंतु उत्तर तर दिलें पाहिजे ना? तो म्हणाला,

"ही प्रार्थना ह्या जन्मासाठीं नाहीं. पुढच्या जन्मासाठीं आहे!"

मीं विचारलें. "संन्याशानें दुसऱ्या जन्माची इच्छा करायला पाहिजे? आणि तदर्थ मनाप्रमाणें वागणाऱ्या सुंदर स्त्रीचीहि आजपासून व्यवस्था करून ठेवावी?"

सगळे हसूं लागले. त्याला काय उत्तर द्यावें तें सुचेना. म्हणून चिडून त्यानें उत्तर दिलें कीं, शास्त्रांचा अर्थ करणें हेंच मूर्खपणाचें आहे. मीं हंसत हंसत त्या मूर्खपणाचा स्वीकार केला आणि जन्मभर अशाप्रकारचा मूर्खपणा करण्याचा आपला हट्ट जाहीर करून वादाचा अंत केला.

परंतु, ह्या गोष्टी तपशीलवार सांगत बसलों तर आपण आठ दिवसांत श्रीनगरला पोंचणें शक्य नाहीं. रावळपिंडीहून दोनशें मैल अंतर आठ दिवसांत कापायचें असेल तर गति वाढवली ही पाहिजेच आणि जसजसें पुढें जाऊं लागलों, तसतशा गव्हाच्या रोटीऐवजीं मक्याच्या पिवळ्या धमक भाकऱ्या आल्या व फळभाजीच्या ठिकाणीं पालेभाजी मिळूं लागली. सृष्टिसौंदर्य मैला मैलांवर अधिकाधिक

आकर्षक बनूं लागलें. वितस्था नदीचा वेग प्रबळ आहे, तेथें एक विजेचा कारखानाहि दिसला. ही झेलम नदी काश्मीरच्या सपाट भूमींत फारच संथ वाहते आणि "बारामुल्ला" नंतर एकदम उतरंडीला लागते. तेथेंच विजेचा कारखाना आहे. ही वीज श्रीनगरमध्यें उपयोगांत येते. कारखान्याच्या आसपासचे पर्वत अगदीं काळ्याकुट्ट आणि गुळगुळीत दगडांचे बनलेले आहेत. वनश्री समृद्ध असून देखील सौम्य आहे. दुपारचें ऊन फारच मादक असतें. रात्रीं थंडीनें कुडकुडावें लागतें खरें, परंतु इकडील लांब लोंकरीच्या मेंढ्या—बकऱ्यामुळें कांबळ्या चांगल्या मिळतात. सूर्योदय व सूर्यास्ताची शोभा नित्य नूतन दिसते. केव्हां केव्हां तर नऊ वाजेपर्यंत सूर्यदर्शन घडतच नाहीं. कारण चहूंकडे उंच उंच पर्वत आहेत. अनेकदा रस्त्यांत लहान लहान झरे आढळतात. रस्त्याशेजारच्या गुळगुळीत दगडांतून पाणी झरत असतें. तहान लागली कीं, झाडाचें पान दगडांत खुपसावें, कीं लागली धार वाहायला !

"बारामुल्ला" ला आम्ही आलों. तेथें अमरनाथ नांवाच्या एका पंड्याशीं गांठ पडली. आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें मी त्याला जबाब दिला नाहीं. परंतु, त्याची चिकाटी माझ्यापेक्षां अधिक ठरली. शेवटीं कंटाळून मी म्हटलें,

" बाबा, तूं आतां जा. माझ्याकडून तुला कांहीं मिळणार नाहीं. मी साधु आहे आणि फुकटचें खाणारा आहें."

बराच वेळ त्याला ती थट्टाच वाटली; परंतु खात्री झाल्यानंतरहि त्याचा लोभ सुटेना. तो म्हणूं लागला,

" तुम्ही साधु असाल तर तुमचे शिष्य माझ्याकडे येतील. माझ्या चोपड्यांत सही करून द्या."

मी त्याला सांगितलें, " मी शिष्य करणार नाहीं आणि महाराष्ट्रांतून अमरनाथची यात्रा करायला माझें नांव घेऊन कोणी येणार नाहीं. तुझेंच नांव सगळेजण घेतात."

मला वाटलें, हा अगदीं रामबाण तोडगा काढला. परंतु, त्यानें एवढेंच उत्तर दिलें कीं, ठीक आज नाहीं तर उद्यां सही द्या.

बारामुल्लाचें विचित्र नांव ऐकून माझी संशोधक–वृत्ति जागृत झाली. लांब·लांब दाढीवाले बारामुल्ला येथें रहात असावेत अशी मी कल्पना लावली. महाराष्ट्रांत ' साळशी ' नांवाचें एक गांव आहे. तेथें सहा आळशी रहात असत. तसेंच कांहींतरी ह्या बारामुल्लाचें असावें, असें मला वाटलें. परंतु, श्रीनगरला जाऊन संशोधन केल्यावर कारण निराळेंच कांहीं निघालें.

आज जेथें काश्मीरचा रमणीय प्रदेश आहे तेथें पुराणकालीं 'सतीसर' नांवाचें सुदीर्घ सरोवर होतें. हरमुख पर्वत आणि पीरपुंजाळ यांमध्यें हें सरोवर पसरलेलें होतें. खुद्द पार्वती ह्या सरोवरांत विहार करीत असे. परंतु नंतर पुष्कळसे राक्षस त्यांत येऊन भरले. म्हणून देवांनीं 'सतीसराचा' नाश करण्याचें ठरविलें. भगवान् कश्यपांनी वराहाची उपासना केली. वराहानें संतुष्ट होऊन आपल्या दातानें पर्वतांत छेद पाडलें आणि सतीसराचें पाणी 'वराह मूलम्' च्या दरींतून वितस्थानदीच्या रूपानें वाहूं लागलें. वितस्था म्हणजेच झेलम; आणि 'वराहमूलम्' म्हणजे बारामुल्ला. पाणी तर कानांत वारा शिरलेल्या वासराप्रमाणें पळूं लागलें. परंतु, दोन मोठ्या झऱ्यामुळें कांहीं केल्या सरोवर रितें होईना. भगवान् कश्यपानें पुनः विष्णूची प्रार्थना केली. विष्णूला पुन्हां कष्ट देणें गरुडाला योग्य वाटलें नाहीं. त्यानें आपल्या चोचींत दोन दगड आणले. आणि वरून बॉंबप्रमाणें बरोबर अचुक त्या झऱ्याच्या मुखावर टाकले. तेच आजचे श्रीनगरजवळचे हरिपर्वत व शंकराचार्यांची टेकडी.

भूस्तरशास्त्रज्ञ म्हणतात कीं, ही पौराणिक दंतकथा सोळा आणे खरी आहे. हरमुख पर्वत व पीरपुंजाळची टेकडी ह्यावर अजूनहि शिंपले आणि माशांचे अवशेष सांपडतात. त्यांचें म्हणणें आहे कीं, 'सतीसर' कांहीं नाहीं तरी दोन हजार फूट खोल असलें पाहिजे.

बारामुल्ला येथें ज्या सरदारजींच्या धर्मशाळेंत आम्ही उतरलों होतों ते संध्याकाळीं स्वतः येऊन आपल्या हातांनीं साधूंना रोटी व भाजी वाढतात व आपणहि तेथेंच साधूंच्या पंक्तीला बसून जेवतात. साधू म्हणत होते कीं, सरदारजी मोठे धर्मात्मे आहेत.

सकाळीं उठून मी झेलम नदीच्या कांठीं फिरायला गेलों. कांठावरचें सौंदर्य अपूर्व होतें. पण मच्छरहि तसेंच होते. एकदां शरीरावर येऊन बसले कीं, त्यांना मारलें तरी ते उडून न जाण्याइतके समाधिस्थ बनून जात. थोडें दूर गेल्यावर मला एक ' हाऊस-बोट ' दिसली. हाऊसबोट म्हणजे नदींत बांधलेलें एक छोटेसें घर. त्यांत सामान्यतः एक पडवी, तीन खोल्या, स्वयंपाक घर आणि वर आगाशी इतकी सोय असते. आगाशीवर एक दोन आराम-खुर्च्याहि असतात. त्या नौकागृहाची व्यवस्था प्रवाशांच्या दृष्टीनें अगदीं अनुकूल अशी असते. घर भाड्यानें घेतलें तर त्यांत टेबल खुर्च्या वगैरे कांहीं मिळायचें नाहीं. आणि नोकरहि शोधावा लागतो. पण नौकागृह घेतलें कीं सगळ्या कांहीं सोयी. होडीवाला तुमचें सगळें काम करील. तुम्हांला हरकत नसेल तर त्याची बायको तुम्हाला स्वयंपाक करूनहि घालील. आणि सगळ्यांत मोठा लाभ हा कीं, वाटेल तेव्हां तुम्हांला आपलें घर वाटेल तेथें नेतां येतें. आज ' वूलर ' सरोवरांत आणि चौथ्या दिवशीं " बीजब्यारांत "

नौकागृहांत एक पंजाबी गृहस्थ वर्तमानपत्र वाचीत बसले होते. मीं पुष्कळ दिवसांत माझें प्रिय ' मॉडर्न रिव्ह्यू ' वाचलें नव्हतें. त्यामुळें मला वाचण्याची तलफ आली होती. मीं त्यांना सरळ विचारलें कीं, तुम्ही " मॉडर्न रिव्ह्यू " मागवतां कां? माझा हा अविवेकी प्रश्न विवेकी भाषेंत ऐकून तो गृहस्थ चमकला. काय उत्तर द्यावें तें सुचेना. त्यानीं मला बसण्यास सांगितलें व विचारलें कीं, आपण कुठें उतरलां आहांत? सरदाराचें नांव ऐकतांच त्यांनीं म्हटलें—

" मी आपल्या सारख्या साधूला त्याच्याकडे उतरूंच देणार नाहीं. तो तर महाठक आहे. व्यापारांत सगळ्यांना फसवतो, जुगार खेळतो आणि तें सारें पाप धुवून काढण्यासाठीं साधूंना खाऊं घालतो. आपण आतां माझ्याकडेच राहिलें पाहिजे."

मला नवे नवे अनुभव घ्यायचेच होते. आणि सरदारसाहेबांचा मीं कांहीं निमंत्रित पाहुणा नव्हतों. तेव्हां मी हो म्हटलें. त्यांनीं माझ्यासाठीं दूधांत

शिजवलेला भात रांधला होता. कांठावर टेबलावर बसून आम्ही जेवलों. त्यांचा स्वयंपाकी फारच प्रेमळ होता. त्यानें जेवढा भात रांधला होता, तेवढा सगळाच मला खावा लागला. बुवा " स्वयंपाकी " असल्यामुळें सुटले. आमचे यजमान शीख होते, त्यांच्याकडून शीख लोकांच्या गोष्टी, त्यांचें सामाजिक जीवन आणि पंजाबची स्थिति जाणून घेण्याची मला चांगली संधी सांपडली.

आमचें जेवण आटोपतें तोंच दुसरे शीख गृहस्थ येऊन म्हणाले कीं, संत अतरसिंग शहरांत आले आहेत. संत अतरसिंग यांची शीख समाजांतील प्रतिष्ठा असाधारण आहे. किती तरी वेळां शीख लोकांनीं त्यांची हत्तीवरून मिरवणूक काढली आहे. हजारों शीख अतरसिंगाचीं वचनें ईश्वर–वचन–तुल्य मानतात. आमच्या यजमानांनीं विचारलें, "अतरसिंगाचें दर्शन घ्यायला जायचें आहे का ?" मी म्हटलें, " मीं त्यांच्याविषयीं पुष्कळच ऐकलें आहे त्यामुळें दर्शन-लालसा आहे." सायंकाळीं आम्हीं शहरांत गेलों. संत अतरसिंग एका अंगणांत सतरंजीवर बसले होते. त्यांचा पोशाख पांढराशुभ्र होता. मुद्रा शांत व प्रसन्न होती. आसपास पांचपन्नास शिष्य बसले होते. महाराजांनीं सांगितलें कीं, 'शब्द' बोला. तेव्हां शिष्य गाऊं लागले. भक्तिरसानें ओथंबलेलीं भजनें ऐकून अर्थ समजला नव्हता तरी माझें हृदय भरून आलें. पंधरा वर्षांचा एक मुलगा सुन्दर गात होता. त्याच्या तोंडावर नम्रता व अंतःकरणाची स्वच्छता अगदीं स्पष्ट दिसून येत होती. अधिकाधिक लोक जमूं लागले. संतसाहेबांनीं आम्हांस प्रसादासाठीं थांबण्यांस सांगितलें. मीं ताबडतोब होय म्हटलें व बुवांना क्षमा करायला सांगितलें. 'ते स्वयंपाकी आहेत' मीं म्हटलें. महाराजजींनीं त्यांच्याकडे पाहून म्हटलें—

"यह सब पाखंड आप छोड दीजिये. साधुके लिये यह ठीक नहीं है."

दुसऱ्या दिवशीं टांग्यांत बसून आम्ही श्रीनगरला जावयास निघालों. बुवा खूप थकले होते. म्हणून टांग्यांत बसणें योग्य वाटलें. रावळपिंडीपासून बारामुल्लापर्यंत डोंगरी प्रदेश आहे; पण आतां रस्ता इतका सरळ आणि सपाट होता कीं एकादे टेनिस कोर्टच. दोन्ही बाजूला 'सफेता' नांवाच्या वृक्षाच्या

ओळीनें रांगा आहेत. दोन दोन हाताच्या अंतरावर एक एक वृक्ष आहे. इंग्रजींत त्यांना ' पॉप्लर्स ' म्हणतात. हें झाड शेंडयापर्यंत सरळसोट जातें. जमिनीपासून सहा फूट उंचीपर्यंत एकहि फांदी फुटणार नाहीं. आणि त्यानंतरहि ज्या शाखा फुटतील, त्या सरळ आकाशाकडे जाणाऱ्या. ह्या झाडामुळें रस्त्यावर दुपारीं एक दोन तासच ऊन पडतें आणि रस्ताहि इतका सरळ कीं, डोळे बांधूनहि दोन चार तास कोणी चाललें तर कशालाच तो अडखळणार नाहीं. पुढें गेल्यावर रस्ता फुटतो. एक श्रीनगरकडे जातो. आणि दुसरा गुलमर्ग-कडे. गुलमर्ग हें युरोपियन लोकांचें खास शहर आहे. तेथें नेहमीं बर्फ पडतें. गुलमर्गची उंची सात हजार फुटांवर असावी. श्रीनगरची पांच हजार आहे. माझा विचार ह्या रस्त्यानें श्रीनगरला जाण्याचा नव्हता. बारामुल्लाला होडींत बसून मला वूलर सरोवरांत जायचें होतें व मग तेथून श्रीनगरला. वूलर सरोवर अत्यंत रमणीय आहे असें म्हणतात. झेलम नदी ह्या सरोवराला एकी-कडून येऊन मिळते आणि दुसरीकडून बाहेर पडते. सरोवर फारच मोठें असल्यामुळें त्यांत मोठमोठी वादळें होतात. ते वादळांचे दिवस असल्यामुळें कोणीहि मला घेऊन जायला तयार नव्हता. होडीवाले कितीहि हुशार असले तरी वूलर सरोवराच्या तुफानांचा अनुभव घेण्याइतकी रसिकता त्यांच्यांत कोठून असणार ? मी निराश झालों आणि बुवांचा सल्ला मान्य करून अरसिक टांग्यांत बसायला तयार झालों.

जवळजवळ पावणे दोनशें मैलांचा इतका दीर्घ प्रवास केल्यानंतर टांग्यांत बसतांना एकादें खराब अपवित्र काम आपण करीत आहोंत असें मनांत आलें. आणि घोड्याच्या वेगानें जात होतों तरी मनाला कसेसेच वाटूं लागलें. पृथ्वी चाकाखालीं किती झपाट्यानें मागें पडत आहे हा विचार नवीन माणसाला प्रोत्साहित करतो. परंतु आम्ही तर शहरांतले जुने किडे. मला तर आमचा तो वेग पाहून ग्लानि आली. त्यामुळें उरलेल्या रस्त्यांत कांहीं काव्यमय आहे असें वाटलें नाहीं.

वाटेंत एक मोठें मंदिर पुरातत्वखात्यानें जुने दगड पुन्हां जुळवून उभें

केलें होतें. प्रत्येक दगडावर त्या खात्यानें पांढरे नंबर घातले होते. ते असे खायला धांवत कीं त्यापेक्षां कोसळलेलें मंदिरच चांगलें असें वाटूं लागे. वाटेंत एक गांव आलें. तेथल्या दुकानदारानें आग्रहपूर्वक म्हटलें—

'इतक्या उन्हाचे तुम्ही कोठें निघालां आहांत ? थोडें गार पाणी प्या आणि अर्धा एक तास झोपा म्हणजे आराम वाटेल.'

त्याच्या दृष्टीनें हवा फारच गरम होती. आम्हांला तसें वाटत नव्हतें. साधूविषयींची ही भावना आणि अशाप्रकारचा पाहुणचार अगदींच नवा होता. म्हणून मला फारच आश्चर्य वाटलें. जातांना दुसऱ्या ठिकाणीं एका महादेवाच्या मंदिराकडे जात असलेला एक पुजारी दिसला. त्याच्या मागें मागें एक मुसलमान नोकर डोक्यावर पाण्यानें भरलेला एक मातीचा घडा घेऊन जात होता. मंदिराच्या दारांत पुजाऱ्यानें नोकराला थांबविलें व त्याच्याकडून पाण्याचा घडा घेऊन त्यानें महादेवाला अभिषेक केला. मुसलमानाचें पाणी अशाप्रकारें महादेवाच्या माथ्यावर पडलेलें पाहून माझा महाराष्ट्रीय कर्मठ कर्मकांडी आत्मा विस्मय पावता झाला परंतु सुधारक आत्मा हर्ष पावला.

सायंकाळ होण्यापूर्वी आम्ही सात पूल असलेल्या श्रीनगरच्या "ममीराकदल" नामक प्रख्यात पुलावर येऊन पोंचलों. टांगेवाल्यानें आम्हांला आमच्या सामानासहित ह्या पुलावरच सोडून दिल. म्हणूं लागला कीं पुढें येणार नाहीं. तुम्हाला जेथें जायचें असेल तेथें जा. मी गोंधळलों. आमची अडचण पाहून आम्हां विषयीं सहानुभूति दाखवणारे पुष्कळ लोक आमच्या आसपास गोळा झाले. त्यामुळें तर मी अधिकच गोंधळलों. शेवटीं बुवांना सामान संभाळण्यासाठीं ठेवून मी राज्याच्या धर्माधिकाऱ्याच्या निवासस्थानाचा तपास करण्याकरितां श्रीनगरांत घुसलों.

---

## हिंदुस्थानचें व्हेनिस-श्रीनगर ७

इटालीतलें व्हेनिस शहर मीं पाहिलें नाहीं. मग काश्मिरातलें श्रीनगर हिंदुस्थानचें व्हेनिस आहे असें मी कसें म्हणू ? श्रीनगरांतील मार्ग पाण्याचे आहेत. इतर शहरांत जसें गाडीत बसून ह्या पेठेंतून दुसऱ्या पेठेंत जातां येतें तसें येथें होडीत बसून जातां येतें. आपल्याकडे दोनचार गाड्या एकाचवेळीं रस्त्यावरून जात असल्या म्हणजे किती गोंगाट होतो ! डोकें अगदीं पिकून जातें ! श्रीनगरांत असें कांहीं वाटणार नाहीं. लांब लांब व अरुंद होड्या कसलाच आवाज न करतां तीरासारख्या निघून जातील. नदीचें पाणीहि किती संथ ! वरून खालीं जायला होडीला जितका वेळ लागतो, जवळजवळ तितकाच खालून वर जायाला लागतो. नदी सर्पाकार वाहते. तिच्या दोन्ही बाजूला लांब लांब कालवे काढलेले आहेत. नदी आणि कालव्यांच्या दोन्ही कांठांवर इमारती आहेत. त्यामुळें ह्या जलमार्गांची सोय झाली आहे.

श्रीनगर काश्मीरची राजधानी आहे. हिमालयाच्या उत्तुंग पर्वतांच्या मध्यें पक्ष्यांच्या घरट्यासारखा जो तीस चाळीस मैलांचा सपाट प्रदेश आहे, त्यांत हें शहर आहे. वर सांगितल्याप्रमाणें " वितस्था " नदी अगदीं सौम्य आणि संथ आहे खरी पण जेव्हां पावसामुळें किंवा पर्वतावरील बर्फ वितळल्यामुळें तिला पूर येतात तेव्हां श्रीनगरमधील घरांत पाणी शिरतें. पुष्कळ वेळां घरें कोसळून पडतात. नदीवर पूल बांधलेले आहेत. त्यांना इकडे 'कदल' म्हणतात.

श्रीनगरला जाण्याचे मुख्य रस्ते दोन आहेत. एक रावळपिंडीवरून आणि दुसरा जम्मूवरून. रावळपिंडीचा रस्ता झेलम नदीच्या कांठाकांठाने गेला

आहे. त्या रस्त्यानें टांगे व मोटारी जाऊं शकतात. जम्मूचा रस्ता डोंगरी असल्यामुळें पायरस्ता आहे. त्या रस्त्यावर घोडे चालतात. आपल्या इकडील घोडे नाहीं, काश्मीरकडचे तट्टू. रावळपिंडीचा रस्ता अनेक ठिकाणीं टेकड्या फोडून तयार केलेला असल्यामुळें पावसाळ्यांत धोक्याचा आहे. टेकड्या मोठमोठ्या फत्तरांच्या व मातीच्या बनलेल्या आहेत.

कवींना नंदनवनाची उपमा काश्मीरवरूनच सुचली असावी. जम्मूचा रस्ता जहांगीर बादशहानें जास्त प्रचारांत आणला."पीरपुंजाल" पर्वत ओलांडतांच हा रस्ता आपणांला एकदम पृथ्वीवरील स्वर्गात घेऊन जातो. एका उंच उंच आणि हिरव्यागार पालवीने आच्छादलेल्या पर्वताच्या पायथ्याशीं आपण येऊन पोंचलों कीं एक अष्टकोणी तलाव एकदम नजरेत भरतो. आतलें पाणी म्हणजे जणुं नीलमण्यांचा अमृतरस. पहातांच वाटूं लागतें कीं येथें कोणीतरी निळीने भरलेले कपडे धुतले असावेत. इतकें स्वच्छ, गोड आणि गार पाणी दुसरीकडे कुठलें मिळायला ? हा तलाव जहांगीर बादशहानें बांधविला आहे. ह्या तलावांतच झेलम नदीचा उगम आहे. तलावांतून एक सुंदर बांधलेला कालवा निघतो. त्यांत असंख्य मासे चमचमत असतात. ह्या विभागांत मासे मारण्याची मनाई नसती तर हें सौंदर्य केव्हांच नष्ट झालें असतें. ह्या ठिकाणाला 'वेरीनाग' म्हणतात. त्याच्यापुढें 'खनबळ' नांवाचें एक ठिकाण आहे. तेथें नदीचें पात्र होड्या चालण्यालायक रुंद बनतें. झेलमला सरळ वाहाणें माहितच नाहीं. एका ठिकाणीं तर अडीच मैल पुढें गेल्यावर तिनें इतकीं वळणें घेतलीं आहेत कीं त्यामुळें चौदा मैलांचा टापू आक्रमिला गेला आहे.

श्रीनगरजवळ दोन रमणीय टेकड्या आहेत. एक फार उंच आहे. दुसरी तितकी नाहीं, पण रुंद खूप आहे. उंच टेकडीला "शंकराचार्यांची" टेकडी म्हणतात. मुसलमान तिला "तख्त-इ-सुलेमान" म्हणतात. तिच्यावरून दूरपर्यंत दिसणारें चहूंकडचें सौंदर्य अत्यंत चित्ताकर्षक आहे. तिच्यावर जवळ जवळ २२०० वर्षांचें जुनें महादेवाचें एक मंदिर आहे. रुंद टेकडीला

"हरिपर्वत" म्हणतात. अकबर बादशहानें त्याच्यावर किल्ला बांधला आहे. ह्या टेकडीवर "माताजीचें स्मारक" आहे. जहांगिराची बेगम नूरजहाँ जेव्हां जेव्हां हरिपर्वतावर हवाफेरासाठीं येत असे तेव्हां तेव्हां बदामाच्या झाडाखालीं बसत असे. नूरजहाँ येण्याच्या आधीं उष्णतेमुळें बदामाचीं फुलें गळून जाऊं नयेत म्हणून काश्मीरचा सुभेदार त्या झाडाच्या सभोवार बर्फ पसरीत असे. नूरजहाँ आली कीं बर्फ काढून टाकण्यांत येत असे आणि अगदीं देठाशीं आलेल्या फुलांची एकदम वृष्टि होत असे. एका बेगमेला एक दिवस खुश करण्यासाठीं हजारो मजुरांना बर्फांत काम करावें लागत असे !

श्रीनगरच्या आसमंतांत 'शालमार बाग', 'निशात-बाग' वगैरे रमणीय उपवनें आहेत. त्यांत उडणारीं कारंजीं, आसपासचीं झाडें आणि नाका-गालावर स्पर्श करून जाणारा गार वारा; हा सगळा आनंद इतका उन्मादक असतो कीं हें ठिकाण सोडून जावेंसे वाटत नाहीं. परंतु श्रीनगरांतलें खास सौंदर्य म्हणजे तेथला "चीनार बाग." चीनार हा वृक्षांचा राजा आहे. वडाच्या खोडाइतकें मोठें त्याचें खोड असतें आणि पानें एरंडाच्या पाना-एवढीं मोठीं व कातरलेलीं असतात. परंतु पानाचा रंग एरंडाच्या पानाप्रमाणें फिक्कट हिरवा नसून गाढ हिरवा असतो. एक झाड एका तंबूचें किंवा धर्म-शाळेचें काम करतें.

श्रीनगरचा 'सीझन' म्हणजे आषाढ श्रावण. आषाढ महिन्यांत तेथील वनश्रीचा वसंत उच्चांक गाठतो. गुच्छेदार फुलांच्या मध्यें कोठें कोठें हिरवीं पानें पाहून खूप आनंद होतो. आणि त्याबरोबरच जमीनीचा सुपीक-पणाहि कळून येतो. श्रावण संपला कीं सफरचंद, पेर, चीकु, गौरीफल, अखरोड वगैरे निरनिराळ्या फळांची भेट पृथ्वीमाता आपणांस देत असते. नासपातीना तर तेथें कोणी विचारीत नाहीं. सुवासिक भात आणि कडमच्या भाजीचा साधा आहार देखील मिष्टान्नासारखा वाटतो. स्वयंपाकांत चिंच आमसुलांऐवजीं आंबट द्राक्षें आणि डाळिंब वापरलें जातें. जवळ जवळ सगळे लोक मांसाहारी आहेत. काश्मीरांत जाती दोनच. ब्राह्मण आणि मुसलमान.

ब्राह्मणाला पंडित म्हणतात. जो मुसलमान नाहीं तो पंडित. खुद्द श्रीनगरांत ऐंशी टक्क्याहून अधिक वस्ती मुसलमानांची आहे. श्रीनगरांत पुरातन कारागिरीचें काम खूप होतें. आखरोडाच्या लांकडाच्या निरनिराळ्या वस्तु बनविण्यांत येतात. आणि त्यावर हस्तिदंताची वेलबुट्टी जडविण्यांत येते. काश्मिरी शाली तर प्रख्यातच आहेत. शालींवर कोणत्याहि प्रकारची आकृति अगोदर काढून न घेताहि तेथले मुसलमान कारागीर बसल्याबसल्या सुंदर किनारी तयार करतात. येथली मिनाकारीहि ख्यातनाम आहे. काश्मीरचा व्यापार मध्यआशियाशीं सदाच चालत आला आहे.

काश्मीरची हवा फारच थंड असते, हें सांगण्याची जरूर नाहीं. त्याच्यावर येथील लोकांनीं फारच साधे उपाय शोधून काढले आहेत. ते पट्टूचे लांब लांब डगले घालतात. इतकेंच नव्हे तर त्यांच्या बाह्या हातापेक्षां वीत दोन वीत लांब ठेवतात. शाळेंत जाणाऱ्या मुलानें एकदोन पुस्तकें घेतलीं तरीहि तीं बाहीच्या आंत झाकलीं जातात. मुलें कांहीं खायचें असलें तरी होताहोईतों बाहीतून बाहेर हात काढीत नाहींत. खाण्याची वस्तु तशीच हातांत धरून खातात. प्रवासी लोक एका वेताच्या टोपलींत एक लहानशी शेगडी ठेवून ती गळ्यांत बांधतात व त्याच्यावर हात शेकतात.

श्रावण पौर्णिमेला '**अमरनाथची**' यात्रा असते. निर्मनुष्य प्रदेशांतून चार दिवस प्रवास करून अमरनाथची गुहा गांठता येते. गुहेच्या एका कोपऱ्यांत पाणी ठिबकतें आणि तें गोठून त्याचेच नैसर्गिक शिवलिंग बनतें. निसर्गाच्या नियमाप्रमाणें घडणारें हें अद्भुत दृष्य पाहण्याला हजारो यात्रेकरू गोळा होत असतात.

काश्मीरांत आगगाडी गेलेली नसल्यामुळें तूप, दूध, तांदूळ, फळें सगळें कांहीं स्वस्त मिळतें. इथलें हवापाणी चांगलें असल्यामुळें आरोग्यहि चांगलें राहतें. जगांतील जितके प्रवासी काश्मीरांत येतात ते सारे म्हणतात कीं काश्मीर हा खरोखरच पृथ्वीवरचा स्वर्ग आहे.

---

# सहस्रधारा

८

एकादे वेळीं जुनें ऋण टाळतां येईल. परंतु जुने संकल्प टळत नाहींत.

पंचवीस वर्षांपूर्वी मी देहरादूनला गेलों होतों तेव्हांच सहस्रधारा पाहावयास जाण्याचा संकल्प केला होता. उत्कंठा खूप होती, परंतु जाणें मात्र झालें नाहीं. त्याबद्दल बरेच दिवस चुटपुट लागून राहिली होती. नंतर तीहि गेली. कांहीं वर्षें लोटल्यावर जगांत सहस्रधारा म्हणून एकादें ठिकाण आहे हें देखील स्मरणातून निघून गेलें.

पण केलेला संकल्प टळणार थोडाच !

आचार्य रामदेवांनीं मला फार गळ घातली मीं त्यांचें 'कन्या गुरुकुल' पाहायला यावें म्हणून ! तें वाढतें रोपटें मलाहि पाहायचें होतें. गेल्या वर्षी जातां आलें नाहीं. त्यामुळें यंदा जावें लागलें. तेथें लोकांना भेटायचें आहे, संस्था पाहायच्या आहेत, राष्ट्रीय प्रश्नांची चर्चा करायची आहे, चांगलीं चांगलीं माणसें शोधून काढून त्यांना कामें सोपवून द्यायचीं आहेत, कार्यकर्त्यांशीं विचारविनिमय व अनुभवाची देवाण घेवाण करायची आहे. केवळ निसर्गाच्या मागे वेडापीर होऊन भटकायचें नाहीं—असले विचार मनांत चालले होते. सहस्रधाराचें मग त्यांतून स्मरण तरी कसें व्हावें ? मी तर हिंदी हिंदुस्तानीच्या चर्चेतच रंगून गेलों होतों. त्यावेळीं तरुण रणवीर मला भेटायला आला. कोणी तरी त्याची ओळख करून दिली. त्यानें आपण होऊनच म्हटलें कीं येथील प्रेक्षणीय स्थळें म्हणजे 'फॉरेस्ट कॉलेज' आणि 'लष्करी शाळा' (सँडहर्स्ट मिलिटरी स्कूल) व प्राकृतिक दृश्यें म्हणजे 'गुच्छुपाणी' आणि

'सहस्त्रधारा'. शेवटचें नांव कानीं पडलें आणि बस्स! पंचवीस वर्षांपूर्वीचा जुना संकल्प आणि जुनें स्मरण विस्मृतीच्या दगडी थडग्यांचा चक्काचूर करून भुतासारखें समोर उभें ठाकलें.

त्यांना गति दिल्याशिवाय आतां सुटकाच नव्हती. तैलवाहनाची सोय झाली आणि पांचसात मैलांचा उत्तरेचा रस्ता कापून आम्ही राजपुरला येऊन पोंचलों. राजपुरहून अडीच एक मैल पूर्वेकडे जंगलांतून गेलों आणि बरोबर पासष्ट मिनिटें चालून 'सहस्त्रधारा' जवळ केला. सायंकाळची वेळ होती. आमच्या मागे सूर्य अस्ताला जात होता. त्याचे लांबलांब किरण आमच्या समोरचा रस्ता लांबच लांब करीत जात होते. पांचदहा मिनिटांतच मानव संस्कृतीची रजा घेऊन आम्हीं जंगलांत प्रवेश केला होता. पाण्याच्या जोरामुळें खोलखोल दरडी पडल्या होत्या. त्यांच्या मधून गेलेला तो रस्ता! आम्हीं दोघे होतों. गप्पा मारीत चाललों होतों. आसमंतांतलें सौंदर्य न्याहाळीत होतों. आणि वेळेचें मूल्यमापन करीत होतों. 'अमरनाथ' 'मुंगनाथ' 'बद्रिविशाल' सारखीं ठिकाणें पाहिलीं आहेत. त्यांच्या समोर मसूरीच्या डोंगराचा काय पाड? परंतु पुष्कळ वर्षें मैदानांत फिर फिर फिरल्यावर पुनः एकदां हिमालयाच्या पायथ्याशीं जाण्याचा योग आल्यामुळें हें दृष्यहि डोळ्यांना भव्य वाटलें.

मसूरीच्या पर्वतरांगेंतहि अनेक वेळां लॅण्डस्लिप* होत असतात. एकाद्या लढवय्या योद्ध्याला जबरदस्त जखम व्हावी तसें हें दृष्य दिसतें. मोठमोठे पर्वत लहानमोठ्या वृक्षांनीं झाकलेले असावेत आणि मध्येंच एकादा भाग कोसळून पडल्यामुळें एक सबंध बाजू उघडी पडावी हें पाहून हृदयांत अगदीं कालवाकालव होऊन जाते. अशीं बेढब प्राकृतिक दृष्यें अवाढव्य असतात आणि ह्या अपघाताला कांहीं उपाय नसतो. आम्हीं खालीं उतरलों, वर चढलों

*'श्री नगरकडे' हा लेख पहा.

पुन्हां उतरलों. पुनः खूप वर चढलों आणि डोळे फाकून जातील असा उतारच उतार लागला —

> So steep the path, the foot was fain
> Assistance from the hand to gain.

आम्ही चतुष्पाद होऊन हळूं हळूं खालीं उतरलें. रस्त्यांत जेथें जेथें उतरावें तेथें तेथें एक दगडाची नदी पसरलेली असायचीच. पावसाळ्यांत ती इतका कोलाहल करते कीं सबंध दरी सहस्रनिनादांनी गर्जून उठते. पण आतां तर सर्वत्र भीषण शांतता. लहान लहान पक्षी एकमेकांना दुरून इशारा करीत नसते तर येथें उभें राहतांनाहि हृदयांत धडकी भरली असती. शेवटचा उतार आला आणि पाहावें तिकडे स्लेटचा दगडच दगड दिसूं लागला. प्राण वांचवण्यासाठीं म्हणून एकाद्या शिळेला हात घालावयास जावें तर तिचा चुराच हातांत पडायचा.

कसें बसें आम्हीं खालीं उतरलों. जवळ जवळ एक तास होत आला होता. ज्या गृहस्थांच्या मोटारींतून आम्हीं आलों होतों ते म्हणूं लागले—

"मी येथेंच बसतों. तुम्ही पुढें जा."

मी उत्तरलों, "आम्ही तुमच्याशीं करार केला होता कीं एका तासांत परत फिरूं. परंतु पोंचायलाच एका तासापेक्षां अधिक वेळ लागेल. तेव्हां तुम्ही परतच जावें व मोटार घेऊन वेळेवर देहरादून गाठावें. आम्ही भाड्याच्या बसनें येऊं."

रणवीर सांगूं लागला—

"आतां दहा मिनिटांतच आपण जाऊन पोंहोंचूं. समोरच्या टेकडीच्या टोकावर जी पांढरी झोपडी दिसते ना तिच्या जवळच सहस्रधारा आहे."

इतके दूर आलों आहोंत त्यांत आणखीं पांच मिनिटें असा विचार करून आम्ही चाललों. सहज मागें वळून पहावेंसें वाटलें. सूर्य आकाशांत लटकत होता. आणि पायथ्याचे डोंगर दोन हात वर करून चेंडू झेलण्याच्या तयारींत उभे असावें असें त्याचें स्वागत करीत उभे होते. मातेच्या हाताकडे

झेप घेतांना मूल ज्याप्रमाणें हसतें आणि माता आनंदित होते तसें हुबेहुब तें दृष्य होतें. अशा वेळीं मातेच्या आनंदांत समभागी व्हावें कीं मुलाच्या निरागस हास्याचा उपभोग घ्यावा ? कुणाच्या सुखाशीं समरस व्हावें हें कळत नाहीं. मनांत गोंधळ उडतो. हेंच एक दृष्य पाहण्यासाठीं येथपर्यंत यावें ! तथापि संकल्प तर सहस्रधाराचा होता. म्हणून आम्ही सूर्यकिरणांकडे पाठ फिरवून पुढें निघालों—

तोंच एकाएकीं सहस्रधाराचा धब्धब्बा उसळत असलेला दिसला. उंचावरून स्वच्छ पाणी घट्ट झालेल्या मातीच्या भिंतीवरून खालीं कोसळतें आणि निनाद करतें. एकलय, एकताल यांत तें मग्न असतें. आजुबाजूला कोणी आहे कीं नाहीं हें पाहण्याची काय गरज ? काय होत आहे त्याची त्याला काय पर्वा ? धब्र धब्र धब्र धब्र अव्याहत चालूंच आहे. दगडांवरून पाणी खालीं आदळतें यांत तेवढें आश्चर्य वाटत नाहीं. परंतु येथें तर आपला हट्ट न सोडणाऱ्या मातीवरून पाणी कोसळतें. मी तर नुसता पाहातच राहिलों. प्रपाताचा नशा इतक्या उन्मादानें चढतो हें जर दारूड्याला कळलें तर तो आपलें व्यसन टाकून अहर्निश येथेंच येऊन उभा राहील. क्षणभर मी हेंहि विसरलों कीं आम्हांला परत जायचें आहे. एका क्षणासाठीं तरी कां होईना जेव्हां आपण निसर्गाशीं तादात्म्य होतों तेव्हां खरोखर अद्वैतानंदाचा साक्षात्कार घडतो. आपणा स्वतःचें भान विसरल्यावर आनंदच शिल्लक राहणार !

तर मग आपण ज्याला जडसृष्टि म्हणतों ती जड नसून अद्वैतानंदाच्या समाधींत एकतान होऊन पडलेली आहे तर ? या प्रश्नाचें उत्तर कोण देईल ?

रणवीर म्हणाला, ‘ आतां आपण आणखी थोडें पुढें जाऊं या. ’ आतां अधिक उशीर करण्याची माझी दानत नव्हती. परंतु थोडेंसें पाहायाचें राहलें असा विषाद मनांत राहूं नये म्हणून मी पुढें निघालों. खालीं पाणी वाहात होतें. संभाळून आम्हीं खालीं उतरलों तो ‘ सुरासाराचा ’ ( गंधक ) वास येऊं लागला. खालीं उतरून थोडेंसें पाणी प्यालों. असें सांगतात कीं सर्व चर्म

रोगांवर हें पाणी ' बहुत मुफीद है ! ' त्या पाण्याचा आणि त्याच्या अद्‌भुत गुणाचा मी विचार करीत होतों. परंतु माझें हृदय त्या धबधब्याच्या निनादाशीं एकतानता पावत होतें. इतक्यांत उजवीकडील एका लटकत्या दरडीवरून पाण्याचें थेंब ओघळतांना नजरेस पडले. जणुं अत्यंत सौम्य आणि मूक जलतरंग किंवा वृंदगायन !

हीच खरी सहस्रधारा. हजारों टिपें ह्या गुहेवरून आणि आंतून टपकत असतात. परंतु त्यांचा आवाज एकत्रित होत नाहीं. शांतपणें टिपें पडतच जातात. एकीकडून आम्ही वर चढलों. तेथें एक खोल गुहा होती. मध्यभागीं खांबासारखा एक दगड होता. त्याला आम्हीं प्रदक्षिणा घातली. सगळीकडे सहस्रधाराचा पाऊस पडत होता. तो सगळा पर्वत वितळतो कीं काय असें वाटत होतें. आम्हीं अगदीं भिजून गेलों. तासभर झपाट्यानें चालून आल्यामुळें शरीर गरम झालें होतें. त्यामुळें हा भिजण्याचा आनंद कांहीं औरच वाटला. किती थंड होतें येथलें वातावरण ! येथें येऊन राहण्यासाठीं मनुष्यजन्म कांहीं उपयोगी नाहीं. येथें तर चातुर्मासांत वेदमंत्रांचा उद्‌घोष करणाऱ्या बेडकांचा अवतार घेऊनच येऊन राहिलें पाहिजे. जें हृदय कांहीं क्षणांपूर्वी शक्तिशाली प्रपाताशीं एकरूप झालें होतें तेंच आतां ह्या रुमझुम रुमझुम करणाऱ्या सहस्रधारांच्या बाळनृत्याशीं तन्मय होऊन गेलें. मी रणवीरचें हृदयपूर्वक धन्यवाद मानले आणि म्हटलें कीं जर इतका भाग पाहिल्यावाचून राहून गेला असता तर मागून पश्चात्ताप झाला असता. पावसापासून संरक्षण करणाऱ्या गुहा मीं असंख्य पाहिल्या आहेत. परंतु उन्हाळ्यांतहि पावसाळा आपल्या पोटांत सामावणारी ही पहिलीवहिलीच गुहा ! सिलोनच्या मध्यभागीं एका ठिकाणीं एक मोठी गुहा आहे. तिच्या एका कोपऱ्यांतून एक लहानसा झरा टपकत असतो. परंतु अशा प्रकारचा अखंड वर्षाव पहिल्यांदाच मी येथें पाहिला. आम्हांला जशी परत जाण्याची घाई होती तशी ह्या पर्जन्याला नव्हती. त्याला आपलें जीवनकार्य सांपडलें होतें. दगडावरच्या शेवाळामुळें पाय निसटत होते. परंतु येथलें सौंदर्य, पावित्र्य आणि शांतता ह्यामुळें ते येथेंच चिकटून राहात होते. आणि ह्या स्थितींत जितका काळ गेला तितकाच फायदा असें मनीं येत होतें.

अखेर परत फिरावें लागलें. दुप्पट वेगानें परत जायचें होतें. रस्त्यांत किती तरी मजूर आणि गुराखी घाईघाईने परत जातांना दिसले. बिचारे गरीब लोक! किती कष्टांत येथे राहात असतील. परंतु सहस्रधारांच्या अमृत वृष्टिखालीं येथे वावरायला त्यांना मिळतें याबद्दल मनाला त्यांच्याबद्दल ईर्ष्या वाटूं लागली.

उतरतांना उतरलों पण आतां अंधारांत चढतां कसें येईल हा प्रश्न उभा राहिला. वाटलें, एखादी काठी सांपडली तर बरें. तेथे एक खेडवळ दुकान होतें. दुकानदाराला म्हटलें,—

'भैय्या, एक अच्छीसी लकडी दे दोगे?'

मला एका कानांनीं ऐकूं येत नाहीं तर दुकानदार दोन्ही कानांनीं बहिरा. माझें म्हणणेंच त्याला समजेना. आणि मी तर अधीर झालेला. शेवटीं एका सोबत्याने त्याला खुणेने सांगितलें. तेव्हां त्याने लागलीच आंतून आपली बांबूची काठी आणून दिली. पैसे देऊं लागलों तें तो घेईना. त्याची काठी घेऊन मींच त्याच्यावर उपकार केले, याची धन्यता डोळ्यावाटें दर्शवीत तो सांगू लागला, 'ले जाइये, आप ले जाइये' आणि जेव्हां रणधीरनें सांगितलें कीं "यह मेहमान तो महात्मा गांधीके आश्रमसे आते हैं" तेव्हां तर मी अतिशय लाजलों व काठी घेऊन धूमच ठोकली.

आतां तोंडाला कुलुप घातलें. पाय पळत होते आणि मनांत प्रार्थना म्हणत होतों. आकाशांत गुरु आणि शुक्र चंद्रावर कांहीं टीका करीत होते.

तो मोटरवाला गृहस्थ डोंगराच्या माथ्यावर बसून आमची परत येण्याची वाट पाहात होता. आम्ही जेव्हां एकत्र झालों तेव्हां तो म्हणाला—'तुम्ही पळत गेलांत आणि धांवत परत आलांत, आणि तितका वेळ मी येथे बसून ह्या दरीच्या भव्य विस्ताराचा, अस्तमान होणाऱ्या प्रकाशाचा आणि पालटत जाणाऱ्या आकाशांतील रंगाचा आनंद लुटीत होतों. तेव्हां सांगा कीं आपणांपैकीं कोणी अधिक आनंद लुटला?'

मनांत प्रतिध्वनी उमटला, "खरोखर, कुणी आनंदाचीं मोत्यें जास्त वेंचलीं?"

---

## गुच्छुपाणी

## ९

दोन वर्षांपूर्वी देहरादूनला गेलों होतों त्यावेळीं एका दिवसाची फुरसत मिळाली होती. कांहीं जणांनीं सांगितलें आपण 'गुच्छुपाणी' पाहयला जाऊं या, तर कांहीं जणांनीं 'सहस्त्रधारा' पाहयला जाण्याचा आग्रह केला.'गुच्छुपाणी' नांव तर मौजेचें वाटलें. परंतु विस्मृतीच्या दडपणाखालीं लपलेल्या जुन्या संकल्पानें सहस्त्रधाराच्या वतीनें आपला कौल दिल्यामुळें गुच्छुपाणी पाहयला जाण्याचें राहूनच गेलें होतें.

यंदा गुरुकुलच्या उत्सवासाठीं यावेंच लागलें. मग गुच्छुपाणीचें निमंत्रण कसें नाकारावें ! दोन तीन तासांची फुरसत असेल तर देहरादूनहून गुच्छुपाणीचा प्रवास सहज करतां येण्यासारखा आहे. पायीं गेलें तर तीन साडेतीन तासांपेक्षां जास्त वेळ लागणार नाहीं. सुरवातीचा दीड एक मैलाचा अस्फाल्टचा वज्रलेप रस्ता हळूं हळूं उंच उंच झाडांमधून आपणांस वर वर घेऊन जातो आणि समोरच्या डोंगरावर झळकणाऱ्या मसुरीच्या गंधर्व-नगरीचे दर्शन करवितो. तेथल्या बंगल्यांच्या वाकड्या तिकड्या रांगा जेव्हां संध्या-किरणांत चमकू लागतात तेव्हां कांचेचे लोलक इतस्ततः विखुरले आहेत कीं काय असा भास होऊं लागतो.

आम्ही रस्ता सोडून डावीकडल्या शेतांत उतरलों, तेव्हां समोर 'शाल'च्या बालवृक्षांची झाडी दिसूं लागली. त्या झाडींतून दगडांशीं खेळत खेळत दक्षिणेकडे जात असलेल्या एका पर्वतकन्येचें दर्शन घडलें. ह्या वेळीं तर तिच्या पात्रांत नांवालाहि देखील पाणी नव्हतें. जिकडे तिकडे वाकडे तिकडे

गुळगुळीत दगडच दगड. निर्जल नदी सामान्यपणें कोणाला आवडत नाहीं. परंतु ज्यावेळीं दोन्ही तटांवर उंच उंच टेकड्या असतात आणि सारा प्रदेश निर्जनरम्य असतो तेव्हां कोरडी नदी देखील भीषण रमणीय रूप धारण करीत असते. पाण्याचा प्रवाह नसेना कां पण हिरव्याचार जंगलांतून पांढऱ्या शुभ्र दगडाचा एकादा पट्टा डोंगरांतून आपला रस्ता शोधीत जात असतो, तेव्हां सहजच मनांत वाटतें कीं, हे दगड शाळेंतील मुलासारखे पळण्याची शर्यत खेळतां खेळतां कां बरें थांबले असावेत ?

आम्ही पुढें चाललों. आरोहण आणि अवतरण. दरडींतून जावयाचें असल्यामुळें दूरवरचा प्रदेश पाहण्याऐवजीं आकाशाकडे पाहूनच संतोष मानून घ्यावा लागत होता. मधून मधून पिवळ्या पांढऱ्या फुलांचा उधळेपणा पाहून वाटूं लागे कीं येथें कोणाचा तरी बंगला असावा. परंतु दुसऱ्याच क्षणीं खात्री वाटूं लागे कीं अशा प्रकारचीं दृश्यें पाहूनच शहरीं बंगलेवाल्यांना फुलें लावण्याची कल्पना सुचली असावी. बंगल्याच्या चार भिंती निसर्गापासून दुरावलेल्या मानवासाठीं आहेत. येथें तर सृष्टीचा विशाल प्रासाद, चार दिशा ह्या त्या प्रासादाच्या चार भिंती आणि आकाश हाच त्याचा घुमट. रात्र होण्यापूर्वी चंद्रतारकांचें छत घुमटांत नियमानें ताणण्यांत येतें. हवा बिघडल्यानें हें छत मलिन होऊं नये म्हणून केव्हां केव्हां त्याला ढगांची गवसणीहि घातली जाते.

फुलें प्रसन्नतेनें हसत होतीं. कोणाकडे पाहून हसत होतीं कोण जाणें ! आम्ही येणार अशी पूर्वसूचना आम्ही कांहीं त्यांना दिली नव्हती. आणि सूचना मिळाली असती तरी आपल्या शिकाऱ्यांचें आगमन त्यांना किती प्रिय वाटलें असतें हा देखील एक प्रश्नच आहे.

मधून मधून लहान झोंपड्या आणि त्या झोंपड्यांचा अपमान न करणारीं चुन्यामातीचीं घरें लागलीं. रस्ते आणि नगरपालिका ह्यांची सोय नसतांहि या घरांचा वनश्रीशीं अप्रतीम मिलाप झाल्यामुळें तेथलें ग्रामीण जीवन शोभायुक्त होतें. इंग्रजांच्या फौजी नोकरींतून निवृत्त झालेले गुरखे निसर्गाच्या

मांडीवर बसून निवृत्तीचा आनंद उपभोगितात आणि आपल्या वृद्ध पहाडी शरीरांना आराम देत असतात.

आम्ही पुढें निघालों. पुढें म्हणजे अगदीं नाकासमोर नव्हे. डोंगरांत व दरडींच्या भोवऱ्यांत जसें घुसतां येईल तसें घुसावयाचें असतें. डावीकडे जायचें असलें तरीहि उजवीकडची वाट पत्करून तिची खुशामत करीत करीत मार्ग कापावा लागतो. आसमंतांतलें सुंदर दृष्य आणि आकाशांतील क्षणोक्षणीं बदलणारे देखावे जरी आपलें लक्ष वेधून घेतात तरी पायावरचें आपलें लक्ष क्षणभर जरी ढळलें तरी डोंगरी नदींतील दगडांप्रमाणें घसरगुंडी नशीबीं यावयाची. पायाखालच्या मोठमोठ्या दगडांवर पाय ठेऊन चाललें तर तें अधिक सुखाचें होतें. परंतु हे मोठमोठे दगड सारख्या अंतरावर कोठून सांपडायचे ? त्यामुळें कोण कोठे आहे, आपला भार डोक्यावर पडला असतां स्थानभ्रष्ट होणार नाहीं असा धीरोदात्त कोण आहे ह्याचा 'सर्वे' करीत करीत जेव्हां पुढे जावयाचें असतें तेव्हां प्रत्येक पाऊल चित्त स्थिर ठेवूनच टाकावें लागतें. हातांत कापूस घेऊन सूत काततांना प्रत्येक तसू तसूंत आपलें चित्त कांतलें जातें त्याप्रमाणे अशा पहाडी यात्रेंत पावलोंपावलीं आपलें चित्त तिच्यांत विणलें जातें आणि त्यामुळेंच यात्रेचा आनंद सघन बनत जातो.

आतां एक मोठी रुंद नदी दिसूं लागली. उजवीकडल्या दरींतून निघून डावीकडे दोन शाखांत ती विभक्त झाली होती. समोरच्या टेकडीवरून आलेल्या तारेच्या खांबांनी पांचसात खांबांचें अंतर सोडून तिला आपल्या मिठींत पकडलें होतें. जणूं काय एकाद्या मुलाने आपले हात आणि आपले डोळे ताणता येतील तितके ताणून नदीचें पात्र इतकें आहे हें दाखविण्याचाच प्रयत्न केला आहे.

ह्या नदीच्या पात्रांतून दोन लहान लहान प्रवाह एकाद्या राजधानीच्या अस्तमान गतवैभवाप्रमाणें आस्ते कदम वाहत होते. त्यांतलें पाणी बालकांच्या हास्यासारखें निर्मळ होतें. तें थोडेंसें 'हास्य' आपणहि उदरस्थ करावें असें वाटलें पण त्यांत धर्मदेवजींची रसिकता आड आली. ते म्हणाले, 'समोर

जो झरा दिसतो त्याचें पाणी एकेकाळी मी रोज सकाळीं येऊन पीत असें, तेथेंच जाऊंया.' आम्ही गेलों. तेथें एका लहानशा टेकडीच्या बाजूवर एक लहानशी गुहा होती. आणि त्यांतून एका अमृततुल्य झऱ्याला अवतरण्याचें सुचलें होतें. कोणा परोपकारी गृहस्थाला त्याच्या तोंडाशीं एक लाकडी नळी लावण्याची बुद्धि झाली होती. त्यामुळें आम्हांस त्या जलदानाचा सहज रीतीनें स्वीकार करतां आला. पाणी पिण्यापूर्वी पश्चिमेकडे ढळणाऱ्या सूर्याला एक मनोमय अर्घ्य द्यायला मी विसरलों नाहीं.

आतां ज्या दिशेला सूर्यकिरण पसरत होते तिकडे हळुहळू नदीच्या पात्रांतून आम्ही चढूं लागलों. पुढें कोणतें दृश्य दिसेल ह्याची कल्पनाच येत नव्हती. एखाद्या नदीचा उगम असेल, की वरून पाणी टपकत असेल किंवा सहस्रधाराप्रमाणें पाण्यांत गंधक असेल अशा अनेक कल्पना मनांत येत होत्या. त्या झरण्याच्या नांवाप्रमाणेंच त्याचें रहस्यहि आम्हांला गुह्यच होतें. ( गुच्छु शब्द गुह्य वरून आला असावा असें वाटतें. )

दूर एक गुहा दिसत होती. तेथें जाऊन पोंचलों तों सारें कांहीं विचित्रच. गुच्छुपाणी म्हणजे काय हें आम्हांला येथें माहित झालें.

डोंगरांतून रेल्वे नेण्यासाठीं त्यांत बोगदा तयार करण्यांत येतो तसाच एका आग्रही प्रवाहानें ही संबंध टेकडी आरपार फोडून आपला रस्ता तयार केला होता. नाहीं. ही उपमा चुकीची होईल. लाकूड किंवा पोरबंदरी इमारती दगड कापतांना करवत खालीं खालीं उतरत जाते तशी ह्या झरण्यानें ही टेकडी कापून काढली आहे. ह्यांत युक्ति नाहीं. केवळ हा मत्यमर्यादेंतील एक खेळ आहे. वज्रकाय पाषाणांना भेदून पाणी निघून जातें तेव्हां आश्चर्यचकित झालेल्या मनापुढें असा प्रश्न उभा राहातो कीं, या दोघांमध्यें अधिक समर्थ कोण ? धीरोदत्त पर्वत आणि त्याची प्राचीन पत्थरांची अभेद्य भिंत कीं एका क्षणाचाहि विचार केल्याशिवाय आपलें बलिदान देण्यास तयार झालेलें हें चंचल आणि तरल नीर ?

त्या विवरांत घुसताना छातींत थोडेसें धडधडावें ह्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. तें तितकेंच आश्चर्यकारक दृश्य होतें. मृत्यूच्या दाढेंत प्रवेश करण्यासारखें तें साहस होतें. आंत घुसतांना मला गीतेच्या अकराव्या अध्यायाचे श्लोक आठवूं लागले. परंतु पर्वत आणि पाण्याची शक्ति ह्यांच्या द्वारें आपलें सामर्थ्य व्यक्त करणाऱ्या प्रकृतिमातेच्या स्वभावधर्मावर विश्वास टाकून आम्हीं आंत उतरलों.

सिमेण्टमध्यें दगड रचावे तसे काळे, पांढरे आणि लाल गोल गुळगुळीत दगड त्या टेकडीच्या निसर्गनिर्मित वज्रलेपांत बसविले गेले होते आणि पायाखालच्या लहान लहान दगडांवरून धावणारा पाण्याचा नम्र प्रवाह आपल्या विजयाचा उद्घोष करीत जात होता. वर दृष्टि फिरविली तों पाण्यानें टेकडीला चिरून बनविलेल्या चांगल्या वीस वीस फुटांच्या भिंती लाखों वर्षांच्या इतिहासाची साक्ष देत होत्या. माझ्याऐवजीं जर एकादा भूस्तरशास्त्री येथें आला असता तर त्याने हे दगड ग्रेनाइटचे आहेत कीं सॅण्डस्टोनचे हें पहिल्यांदा पाहिलें असतें. नंतर भिंतीची उंची किती आहे, पाण्याचा उतार किती आहे, दर दहा वर्षांत पाणी किती खोल उतरतें ह्या सर्वांचा हिशेब करून ह्या निसर्गनिर्मित विवराची आयुर्मर्यादा निश्चित केली असती, आणि सांगितलें असतें कीं ह्या पर्वतीय प्रवाहाची ही क्रीडा पन्नास हजार किंवा दोन लाख वर्षांपासून चालू आहे. बाजूच्या भिंतींतले रंगी बेरंगी दगड पाहून त्याने त्यांना त्यांचें वय विचारलें असतें आणि त्यांना पकडून ठेवणाऱ्या मातीचें वज्रलेप सिमेंट बनण्यांत किती वर्षे गेलीं असतील त्याचें गणित करून टेकडीचे वयहि त्याने आपणांस काढून दिलें असतें, आणि जर कोणी त्याला येथें होऊन गेलेल्या भूकंपाच्या कथेचा इतिहास सांगितला असता तर त्याने आपल्या गणितांत त्याप्रमाणें फेरफार करून नवीन निर्णय आपणांपुढें मांडले असते. त्या वज्रलेप सिमेटांत चामड्यासारखी किंवा बारीक जाळ्यासारखी मधून मधून रांगोळी कशी पडली आहे व त्यांतून पाण्याच्या सूक्ष्म झाऱ्या कशा निघतात तेंहि त्यानें सांगितलें असतें. खरोखर नक्षत्रविद्येप्रमाणेंच ही

भूस्तरविद्याहि अद्भुतरम्य आहे. ह्याचे शोध मनोविज्ञानापेक्षां कांहीं कमी अवघड नाहींत. ह्या तिन्ही विद्या मानवाच्या बुद्धिबलाचा विलास होय.

आम्ही विवरांत दूरवर गेलों. एका ठिकाणीं वर देखील चढलों. जवळच पाण्याचा लहानसा प्रवाह होता. जरा पुढें गेलों तेथें माणसांनीं बांधलेल्या दगड चुन्याच्या दोन भिंती पाहून मी कांहीं केल्या आपलें हंसें आवरूं शकलों नाहीं ! मानवाला वाटलें कीं पर्वतांचे हृदय भेदून जाणाऱ्या पाण्याला आपण दोन भिंतीच्या द्वारा आडवून धरूं शकूं ! माझा भाव समजता क्षणींच तो विजयी धबधबाहि म्हणूं लागला, "आणि मी देखील ह्यामुळेंच हंसत आहे." पर्वताचें भग्न हृदय दुभंगलेलें होतें तरी भव्य दिसत होतें. परंतु मनुष्यनिर्मित ही भग्न भिंत त्यांच्या मनोरथासारखीच हास्यास्पद व तिरस्करणीय भासत होती. एकाद्या उद्दाम माणसाच्या तोंडांत बसली असतां त्याचें बाजूला झालेलें तोंड जसें दयनीय दिसतें तशा दिसणाऱ्या ह्या भिंती फार वेळ पाहण्याची इच्छाहि होत नव्हती. एकाद्याची फजीती बराच वेळ पाहात राहणें बरेंहि नव्हे.

जितकें आंत जावें तितकें त्या विवराचें सौंदर्य अधिकच खुलत गेलें ! तितक्यांत एक दगड दोन भिंतींतून पडतां पडतां मध्येंच अडकलेला दिसला. वरून त्यानें उडी घेतली असावी परंतु बाजूच्या मायाळू भिंतीनी त्याला म्हटलें असावें, 'अरे थांब, पाण्याच्या क्रीडेंत भंग पाडूं नकोस.' काय करणार बिचारा ! लटकत तेथल्या तेथेंच थांबला. वालखिल्याप्रमाणें खालीं डोकें करून पाण्याची क्रीडा नाईलाजानें पाहात बसणेंच त्याच्या नशीबीं लिहिलें गेलें असावें ! त्याच्याविषयीं सहानुभूति दर्शवीत पुढें जावें तों दुसरा एक दगड त्याच्यासारखाच लटकत आणि आपल्या पाटीवर आपल्या तिप्पट वजनाच्या आपल्या भाऊबंदांचा भार वाहात असलेला दिसला. त्याच्या खालूनहि आम्हीं पार झालों. जर बाजूच्या भिंती जराशा कोसळून रुंद झाल्या असत्या तर आमच्या हाडांचे तुकडेच काय पण अगदीं चूर चूर झाला असता आणि दोनचार क्षणापुरतें खालचें पाणी लाललाल झालें असतें. सृष्टिमातेने म्हटलें

असतें, " माझ्या कानावर हात ! चार मानव येथें आले आणि आपल्या रिकामटेकड्या जिज्ञासेचें मूल्य त्यांनीं चुकविलें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी थोडीच आहे ? त्यांच्यासारखेच दुसरे मानव पुन्हां येथें येतील आणि दगडात दडलेले कांहीं अवशेष त्यांना मिळाल्यास त्यांतून खऱ्याखोट्या कल्पना चालवून एकादें प्रकरण निर्माण करतील, दुसरें काय ?"

आम्ही चालून थकलों नाहीं. परंतु गार पाण्यांत दगडावरून अनवाणी चालण्यानें पाय मात्र दुखूं लागले हें कबूल न करणें शक्य नव्हतें. परंतु ह्या विवर-प्रवेशाची अद्‌भुतता अनुभवतां अनुभवतां आम्हीं अगदीं तृप्त झालों. जाऊन जाऊन आंत किती जाणार ? अखेर पुढे जाण्याचा उत्साह मंद पडला. पण मन म्हणूं लागलें, हार खाऊन परत कसें परतावें ? इतकें आलों तो आरपार गेलेंच पाहिजे. दुसरें टोक गांठणार नाहीं तर तें मानवी मनच नव्हे.

पुढें गेल्यावर थोडी रुंद जागा आली आणि प्रवाहाची भीषणताहि कमी कमी होत गेली. तेव्हां शहाणे होऊन आम्ही मानून घेतलें कीं पुढचें दृश्य मिळमिळेंच असणार. गेलों नाहीं तरी चालेल. परतलों. पुनः तें नि तेंच दृश्य त्या नि त्याच भिंती आणि त्याच त्याच भावना !

त्या विवरांतून बाहेर पडायला चांगलीं सोळा मिनिटें आम्हांला लागलीं ! माझ्या संवयीप्रमाणें ह्या यात्रेचें स्मरण म्हणून मी दोन सुंदर गुळगुळीत दगड बरोबर घेतले. आणि अंधारांत झपाट्यानें रस्ता कापीत घराकडे परतलों. मनांत एकच विचार घोळत होता, समर्थ कोण ? हा वज्रकाय प्राचीन पहाड कीं हें नम्र परंतु आग्रही जीवनधर्म स्वीकारलेलें सत्याग्रही नीर ?

---

## कालसीचा शिलालेख



**हिंदुस्थानच्या** धार्मिक, सामाजिक आणि राजनैतिक इतिहासांत सम्राट अशोकाचें नांव अद्वितीय आहे. ज्यांचें व्यक्तित्व जगांत जिवें जागतें आहे असें म्हणतां येईल अशा बोटावर मोजतां येण्यासारख्या व्यक्तींत अशोकाची गणना होते. पुराणांच्या द्वारें राम, कृष्ण, जनक आणि हरिश्चंद्र यांचीं नांवें गांवोगांव आणि घरोघर पसरलीं आहेत; दंतकथांच्या द्वारें राजा विक्रम, भर्तृहरि, भोज, अकबर आणि बिरबल ह्यांच्या कथा घरोघर ऐकावया मिळतात. तद्वतच बुद्ध भगवान आणि अशोक, महिंद्र आणि संघमित्र यांचीं नांवेंहि आपल्या लोकांत परिचित झालीं पाहिजेत.

राजा अशोक एक महान विजेता, साम्राज्यसंस्थापक तर होताच परंतु तो धर्मसम्राट, राष्ट्रपिता, संस्कृतिवर्धक आणि समाजव्यवस्थापकहि होता. जगांतला पहिला मिशनरी अशोकच झाला असें म्हणतां येईल.

दक्षिणेकडील पांड्य, चोल आणि केरळ हे प्रांत वगळून बाकीच्या सबंध हिंदुस्थानावर अशोकाची सत्ता होती. पश्चिमेकडे आज ज्या विभागांना बलुचिस्थान आणि अफगाणिस्थान म्हणतात तेहि अशोकाच्या साम्राज्यांत मोडत असत. एवढ्या मोठ्या साम्राज्यांतली राज्यव्यवस्था एकाच पद्धतीने चालावी आणि केवळ राज्यव्यवस्थाच नव्हे तर लोकजीवनहि एकाच तऱ्हेच्या उन्नत संस्कृतीनें रंगून जावें म्हणून अशोकानें कांहीं नियम तयार केले आणि ते आपल्या साम्राज्यांत ठिकठिकाणीं शिळांवर कोरविले. इतकेंच नव्हे तर आपल्या राज्यव्यवस्थापक आणि धर्मव्यवस्थापक राजपुरुषांना त्यानें

अशी आज्ञा केली होती कीं दर पंधरवड्याला लोकांना जमवून त्यांना हें शासन वाचून दाखवावें म्हणजे अंमलदारांना आणि प्रजेलाहि अशोकाच्या साम्राज्यांत कोणत्या प्रकारची संस्कृति निर्माण करावयाची याचें भान राहील. अशोकाचे हे शिलालेख जवळजवळ एकाच भाषेत कोरलेले सर्वत्र आढळतात. हिंदुस्थानच्या इतिहासांतील अनेक प्रश्नांचा उलगडा ह्या शिलालेखांवरून झाला आहे. अशा प्रकारचा एक शिलालेख 'जुनागड' जवळ 'गिरनार'च्या रस्त्यावर 'दामोदर' कुंडानजीक आहे. दुसरा एक शिलालेख मुंबई जवळ 'शूर्पारक' अथवा सोपाऱ्याजवळील एका दगडावर खोदलेला होता. आज त्याचे खंडित अवशेषच सांपडतात.

सरहद्द प्रांतांत 'शाहबाज गढी' आणि 'मनसेरा' ह्या दोन ठिकाणीं हे शिलालेख सांपडले आहेत. पूर्वेकडे ओरिसांत 'जौगढ' आणि 'धौली' ह्या दोन ठिकाणीं हेच शिलालेख एक महत्वाचा बदल करून खोदलेले आहेत. असाच एक शिलालेख **'देहरादून'** जवळील **'कालसी'** नामक एका रमणीय स्थळीं पाहायला मिळतो.

हे शिलालेख फारच काळजीपूर्वक वाचले गेले आहेत. आणि त्याचे अधिकाधिक शुद्ध आणि प्रमाणभूत अनुवादहि करण्यांत आले आहेत. आतां घरबसल्या हे शिलालेख वांचून त्याच्यावर वाटेल तितका विचार करतां येतो आणि अनुमानें बसवून संस्कृतिमीमांसेत भरहि घालतां येते. परंतु यात्रेकरू म्हणून ह्या स्थळीं प्रत्यक्ष जाऊन तेथली परिस्थिति आणि वातावरण ह्यांपासून अनेक गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. शिलालेख वाचून त्यांचा अर्थ करण्यासाठीं नव्हे तर ह्या धर्मशिळांचें दर्शन घेऊन पावन होण्यासाठीं व आसमंतांतील पर्वतांना आणि नद्यांना, जंगलांना आणि शेतांना अशोकाविषयीं आणि त्याच्या आर्य हृदयाविषयीं अनेक गोष्टी विचारण्यासाठीं आपल्याला येथें गेलें पाहिजे!

**'गिरनारचा'** शिलालेख पाहून चौवीस वर्षे झालीं, 'जौगढ'चा शिलालेख पाहाण्याची संधी जवळजवळ एका तपापूर्वी मिळाली होती, परंतु कांहीं विशेष

कारणांमुळें ती घालवावी लागली. ह्या वर्षी राष्ट्रभाषेच्या प्रचारार्थ हिंडत असतां 'धौली'चा प्रख्यात शिलालेख पाहूं शकलों, आणि त्यानंतर थोड्याच महिन्यांनीं कन्यागुरुकुलच्या* समारंभासाठीं देहरादूनला गेलों असतां 'कालसी' देखील पाहून आलों. सेवाकार्य करीत असतांना आस्थेवाईक मनुष्य आपलें जीवन आणि आपली जीवनदृष्टि अनेक रीतीनें समृद्ध करूं शकतो.

अशोकाच्या शिलालेखांत त्याचा कलिंग-विजय-विषयक उल्लेख दरेक राष्ट्रहृदयाला, नव्हे प्रत्येक मानवी हृदयाला हालवून सोडील असा आहे. बाल्हिकपासून बंगालपर्यंत आणि काश्मीरपासून केरळपुत्रपर्यंत विस्तारलेल्या आपल्या साम्राज्यांत एक कलिंग देश (हल्लीचा उत्तर ओरिसा) अजेय राहावा हें सम्राटाच्या महत्वाकांक्षेला खपलें नाहीं. स्वतंत्र कलिंग अशोकाच्या विजीगिषेला शल्यासारखा खुपूं लागला. मोटें कटक घेऊन त्यानें कलिंगवर चढाई केली. आणि विजेत्याच्या उन्मादानें कलिंगला चिंरिराख करून टाकलें. कलिंगचे ब्राह्मण आणि श्रमण, तेथले गृहस्थी आणि कारागीर सगळेच देशाच्या स्वातंत्र्यासाठीं हिरीरीने लढले असावेत. अशोकानें लाखो लोकांना ठार केलें. त्याच्या असंख्य पटीने लोक लढाईत जखमी झाले. आणि लढाईच्या अखेर पकडले गेलेल्या आणि बंदी म्हणून नेण्यांत आलेल्या लोकांची गणना वेगळीच. रणमत्त सम्राटाची साम्राज्यतृष्णा तृप्त झाली आणि तेथें मनुष्यप्रेमी हृदयाचा उदय झाला. अशोकाची धर्मभावना जागृत झाली. मिळविलेल्या विजयाबद्दल त्याला अतिशय पश्चात्ताप झाला. कांच आणि जरब बसवून नव्हे तर धर्म, क्षमा आणि प्रेम यांचें साम्राज्य पसरवून प्रजेचें कल्याण केलें पाहिजे हें अशोकाच्या मनावर बिंबलें आणि त्याचें पाषाणहृदय विरघळलें. हें हृदय-परिवर्तन आणि ही धर्म-कोमल-भावना त्यानें हिंदुस्थानांतील अनेक पाषाणांवर खोदवून आपणांपर्यंत आणून पोंचविली आहे.

तत्कालीन जनतेने हें विलक्षण परिवर्तन आश्चर्यचकित नजरेने पाहिलें असेल. राजाच्या ह्या नवजीवनाचा परिणाम अनेक प्रांतांतील अनेक सेवकांवर

* 'गुच्छुपाणी' मध्यें ह्या उल्लेख आहेच.

झाला असेल. त्याकाळच्या लोक—गीतांतून अशोकाचा आणि त्यानें पसरविलेल्या धम्माचा ( धर्माचा ) जयजयकार ध्वनित झाला असेल. जितकें रामराज्य तितकेंच किंवा त्याहिपेक्षां उच्चकोटीचें हें धर्मराज्य आहे असें लोकांनी ठरविलें असेल. विस्मृतीच्या शक्तीनें कृतज्ञतेच्या भावनेवर विजय मिळविला. हिवाळ्यांत पेटविलेली शेगडी विझून जाते आणि तिचें रूपांतर सबंध खोलींतील उष्णता वाढविण्यांत होत असतें तसें अशोकानें अमलांत आणलेलें हें जीवनपरिवर्तन जनतेने पचविलें, संस्कृतीशीं तें तादात्म्य पावलें आणि जशी खाल्लेल्या आणि पचल्यावर रक्तांत रूपांतर झालेल्या अन्नाची आठवणहि रहात नाही त्याप्रमाणें अशोक आणि त्याच्या कार्याची स्मृति देखील कृतज्ञ आर्य विसरले. ट्रन्सब्स्टॅंसिएशन ज्याला म्हणतात तें तर हें नसावें ?

परतु भावनाशील मानवानें जें गमावलें तें ह्या जड शिळांनी संग्रहित करून ठेवलें. धौलीला जी शिळा आहे तिचें नांव अश्वत्थामा आहे आणि कालसीला काल जी शिला आम्हीं पाहून आलों तिला तिकडचे लोक ‘चित्रशिळा’ म्हणतात. अश्वत्थामानें आणि चित्रशिळेनें भारतवर्षावर आणि त्याच्या इतिहासावर अनेक तऱ्हांनी उपकार करून ठेवले आहेत. यामुळें मूर्तिपूजक म्हणून नव्हे तर कृतज्ञ राष्ट्रप्रेमी म्हणून ह्या दोन्ही शिळा मला वंदनीय आहेत.

कलिंग जिंकल्याचा उल्लेख आणि पश्चात्तापाची नोंद अशोकानें कलिंग देशांतील शिलालेखांत केली नाहीं परंतु शाहबाज गढी, मानसेरा, काल्सी आणि गिरनार येथील लेखांत आहे. त्यानें हें हेतुपूर्वक केलें असावें ह्यांत कांहींच शंका नाहीं. कांहींजण म्हणतात कीं पश्चात्तापपूर्ण वाणींत कां होईना परंतु कलिंगसंहाराची कथा कलिंग जनतेसमोर वाचली जाणें अशोकाला योग्य वाटलें नाहीं. कलिंगच्या लोकांनीं आपलें दुःख विसरून जावें आणि अशोकाच्या प्रेमळ राज्यशासनाचा लाभ घ्यावा ह्या हेतूने त्याने हा तेरावा शिलालेख जौगढ आणि धौलींत खोदविला नाहीं, परंतु दूरदूर

साम्राज्याच्या दुसऱ्या टोकाला खोदून त्यानें आपल्या पश्चात्तापाची कबुली अजरामर करून ठेवली असावी ह्यांत शंका नाहीं.

कालसीच्या शिलालेखांत दुसऱ्या अनेक गोष्टी आहेत. परंतु ह्याक्षणीं आपलें ध्यान फक्त ह्या राजपश्चात्तापाकडेच वेधतें. दुसऱ्या गोष्टी महत्वपूर्ण तर आहेतच पण त्या कोठें पळून जाणार ?

कालसीच्या शिलालेखांत व धौलीच्या शिलालेखांत एक विशेष साम्य आहे आणि तें म्हणजे त्यावर खोदलेल्या हत्तीच्या आकृतीचें. परंतु ह्याविषयींहि यथास्थानीं लिहितां येईल.

कालसी कोठें आहे त्याचा आम्हीं अगोदरच तपास लावून ठेवला होता. डेहरादूनहून दुपारीं तैलवाहनाच्या साधनद्वारा जाऊन संध्याकाळपर्यंत आम्ही परतूं शकूं अशी खात्री करून घेतली होती. सम्राट अशोकानें हेंच स्थान कां पसंत केलें असावें ह्याचाहि विचार करून ठेवला होता. व्यापाराचें केंद्र आणि यात्रेचें धाम ह्या दोन्ही दृष्टया कालसीचें महत्व त्यावेळीं मोठें असेल ह्यांत शंका नाहीं. डोंगरी रस्ते पुष्कळवेळा नदीच्या कांठाकांठानें जात असतात. नदीचें उगमस्थान मानवाच्या जिज्ञासेचें, शोधक बुद्धीचें प्रतीक आहे. जेथें दोन नद्यांचा संगम होत असतो तेथें मनुष्यजातीच्या प्राथमिक अवस्थेंत व्यापाराचा व तसाच व्यापाऱ्यांचाहि संगम होत असतो. 'पाटलीपुत्र' येथें गंगा आणि शोणभद्राचा संगम आहे. 'प्रयागराज' येथें गंगा आणि यमुनेचा संगम आहे. तसाच 'कालसी'त यमुना आणि टोंस (तमसा) नदीचा संगम आहे. प्राचीन काळापासून मेंढयांची लोंकर घेऊन व्यापारी येथें येत असावेत आणि थावरच्या व तराईतील लोकांशीं व्यापार करीत असावेत. मैदानांतील व्यापारीहि आपल्या मौल्यवान वस्तूंना गिऱ्हाईक शोधत येथें येत असावेत. जेथें व्यापाराचें केंद्र बनतें, जनसमुदाय लोटतो तेथें धर्मोपदेशक अचूक जाऊन पोंचायचाच. धर्मविजयी राजा अशोकानें आपल्या प्रचारासाठीं हें स्थळ निवडलें ह्यांत आश्चर्य तें कसलें ?

कन्यागुरुकुलचा उत्सव पार पाडून आम्हीं कालसी पाहायला गेलों. पंडित धर्मदेवजीनी पुरुषार्थ करून निमंत्रित केलेल्या तैलवाहनाला पुरेसा खुराक देऊन वेळेवर जाण्यायेण्याच्या बाबतींत आम्हीं निश्चिंत झालों आणि वज्रलेप रस्त्यावरून धूम ठोकली. देहरादून शहर आधुनिक सुखसोयी आणि व्यवस्था यांचें प्रतीक आहे. सुंदर सरळ रस्ते, त्यांच्या दोहोंबाजूला लावलेले उंच उंच विशालवृक्ष, त्यांच्यामागें पसरलेलीं स्वच्छ मैदानें आणि मधून मधून दृग्गोचर होणारे सुंदर बंगले—हें सारें दृष्य आल्हादकारक भासतें. क्षितिजाकडे पाहतांना पोकळी दिसेल अशी भीति बाळगायलाच नको. पश्चिमेकडील 'करकरिया' पर्वत आणि त्याच्यावरील मेघांचा विलास हें एक मायावी काव्यच आहे. उत्तरेकडील मसूरीचा पर्वत अनेक आमंत्रणें देतच असतो. पूर्वेकडील सौंदर्य तर कांहीं औरच; कारण आपण जों जों पळत जावें तों तों बाजूच्या सुंदर दऱ्या एकामागून एक उघडत आणि मिटत असतात. येथल्या कामरूपिणी सृष्टीचें नामाभिधान करावयाचें म्हटलें तर तिला प्रमाद म्हणतां येईल इतकी ती मादक आहे. वाटेंत एकदोन 'दृषद्वती' आम्हीं पार केल्या. त्यांच्या पात्रांत काम करणाऱ्या मजुरांविषयीं सहानुभूतीचे चार शब्द बोलून व त्यांतच संतोष मानून आम्ही वीस बावीस मैल गेलों असूं तोंच 'हर्बटपूर' आलें. तेथून उजवीकडे पुन्हां धूम ठोकली आणि 'चूहडपूर' ला येऊन पोंचलों. येथला बाजार खेड्यांच्या दृष्टीनें बराच महत्वाचा समजला जातो. आजकाल कालसीचें महत्व 'चूहडपूर' नें बळकावलें आहे.

चूहडपूरहून थोडें पुढें गेलों आणि आम्ही यमुनेच्या पुण्य–सुंदर दरींत उतरलों. चारी धामांच्या यात्रांचा प्रवास करून आलेल्या यात्रेकरूचेंहि मन मोहित करील अशी ही दरी आहे. यमुनेवरील पुलाचें दृष्यहि कमी मनोहर नाहीं. मानवकृति पुष्कळवेळां निसर्गाशीं तादात्म्य होऊं शकत नाहीं, परंतु पुलांच्या बाबतींत मात्र अपवाद आहे. पूल मनुष्यजातीचे संविकारी मित्र आहेत. ते दोन्ही कांठांना आपल्या आकर्षणाने सांधून एक करीत असल्यामुळें ते

आशिर्वाद रूप ठरून नैसर्गिक वातावरणाला पोषकच होतात. यमुनेवरला हा पूल नळ-नीळ-जांबुवंतांच्या जातींत ( एंजिनियरांत ) बराच वाखाणला जातो. भौगोलिकदृष्टयाहि ह्या पुलानें महत्त्वाचें स्थान पसंत केलें आहे. कारण पाटोपाठ येणाऱ्या दोन संगमांमध्यें तो आडवा पडला आहे. वर अनाविला अमलवा नदी बोबडे बोल बोलत यमुनेला भेटते, तर खालीं यमुनेच्या जेष्ठ भागिनीसम तमसा नदी आपल्या विशाल आणि सखोल पात्रासह यमुनेंत समाविष्ट होते. जर पक्षपात न करतां गौरवाचाच विचार करून निर्णय द्यावयाचा असता, तर यमुना नदी तमसेला मिळते असें मनुष्यानें म्हटलें असतें व त्यामुळें पुढील प्रवाहाला तमसेचेंच नांव दिलें असतं. पण यमराजकन्या कालिन्दी लहान असली म्हणून काय झालें ? तिची महत्ता गंगेलाच शरण जाण्यांत आहे. तमसेनें आपल्या जीवनाबरोबर आपलें नांवहि त्यागलें आणि यमुनेच्या वृद्धींतच आपलें सार्थक मानलें.

कालसीच्या आसपासचे पर्वत चांगले लांबरुंद आणि विशाल असल्यामुळें गर्दीमुळें जी भीषणता येते, तशी येथें भासत नाहीं. कालसीच्या ह्या खोऱ्यांत विहरणाऱ्या माणसाला पर्वतासमोर अपमानित झाल्यासारखें वाटत नाहीं. पर्वताची चढण जेव्हां अगदीं कठिण असते, तेव्हां तेथलीं झाडेंहि फारच टेंगणीं असतात. तीं कशींबशीं जगत आहेत आणि आपली सर्व शक्ति खर्ची घालून आपलें स्थान टिकवून धरीत आहेत हें पाहून त्यांच्याविषयीं दयायुक्त आदर वाटतो. येथें असें कांहीं नाहीं. येथले वृक्ष असे कांहीं स्वस्थ आणि पुष्ट आहेत कीं, ते आपल्या मनांत ईर्षाच उत्पन्न करतात.

कालसीच्या डाकबंगल्यापाशीं येऊन आम्हीं थांबलों आणि उजवीकडे जो अमलवाचा एक छोटासा कालवा आहे त्याच्या कांठीं जाऊन पोंचलों. चित्रशिलेच्या सभोंवार प्राचीन-वस्तु-संरक्षक खात्यानें थोडेंसें बांधकाम केलें आहे असें मीं वाचलें होतें. परंतु मला ह्याची कल्पना नव्हती कीं आबूच्या रेल्वेवर जशा धुमटवाल्या खोल्या असतात, तसें कांहीं येथें असेल. डाक-

बंगल्याच्या खानसाम्यानें ती खोली आम्हांस उघडून दिली आणि जिला पाहण्याची दीर्घकालपासून उत्कंठा लागली होती, ती शिळा आम्हीं पाहिली. दहा फूट उंच आणि तितकीच रुंद अशी ती शिळा प्रथमदर्शनीं आमच्याशी चकार शब्दहि बोलली नाहीं. आम्हीं तिला प्रदक्षिणा घातली. दर्शनलोभी डोळयांनीं लेखांचा शोध चालविला. परंतु कांहींच पत्ता लागेना. मनांतील क्षोभ थोडासा ओसरल्यावर आणि डोळयांना तेथल्या प्रकाशाची संवय झाली तेव्हां, आमच्या उजव्या बाजूला म्हणजे शिळेच्या डावीकडे हत्तीची एक आकृति कोरलेली दृष्टीस पडली. हत्तीच्या पुढल्या व मागल्या पायांमधील जागेंत 'गजतम' हीं चार अक्षरें खोदलेलीं आहेत. माझ्याबरोबर आलेल्या हरिश्चंद्रानें सांगितलें कीं, उलटून (अप साइड डाउन) अक्षरें वाचूं जातां रोमन लिपींतील RYAV असें वाचतां येतें. धौलींतील शिलेचा एक भाग खोदून हत्तीचा दर्शनी भागच मूर्तीसारखा बनविलेला आहे. येथें हत्तीची संबंध रूपरेखा काढलेली आहे. ही आकृतिहि मी कल्पना केली होती तितकी मोठी न निघाल्यामुळें थोडीशी निराशा वाटली; परंतु त्यामुळें माझी भक्ति कमी झाली असें मात्र नाहीं. कारण ह्या हत्तीची आकृति बौद्ध मताप्रमाणें तुषित स्वर्गांतून अवतरलेल्या खुद्द बुद्ध भगवानाची प्रतिनिधी आहे. एका ठिकाणीं हत्तीखालीं 'व स्वेतो हत्ती सवा लोक सुखा हरोनाम' असा मजकूर आहे. कालसीची ही चित्रशिळा इतकी शुभ्र आहे कीं, त्यावर खोदलेल्या हत्तीला श्वेत हत्तीच म्हणतां येईल. आतां येथें लेखहि पाहूं शकलों. शिळेच्या साफ केलेल्या गुळगुळीत बाजूवर लेख पुरा न होऊं शकल्यामुळें उजवीकडे जशी जागा सांपडेल तसा खोदून पुरा करण्यांत आला आहे.

अशोकाच्या काळीं ह्या प्रदेशाची किती भरभराट असेल, किती लोकांनीं येथें येऊन अमलवा–यमुनेच्या संगमांत स्नान करून ह्या शिळेची प्रदक्षिणा केली असेल! गजतम बुद्ध भगवानांना चंदन चढवून अशोकाचें धर्म–प्रज्ञापन वाचलें असेल आणि ह्या धर्मसम्राटाची प्रेरणा हृदयांत धारण करून पशुपक्षाविषयींच्या प्रेमानें भारून जाऊन ते परत आपापल्या घरीं गेले

असतील! तमसा आणि यमुनेच्या संगमावर जेव्हां जेव्हां यात्रा भरली असेल, तेव्हां तेव्हां लोकांनीं नदीच्या कांठाकांठानें कोस दोन कोस चालून ह्या शिळेचें दर्शन घेतलेंच असावें!

पशुहत्येस मानणारा शाक्त-संप्रदाय आपल्या देशांत किती पुरातन आहे! जेथें जेथें भयंकर पशुहत्या होत असेल तेथें अशोकानें जाऊन लोकांना असा हुकूम सोडला नसावा काय कीं, ह्या ठिकाणीं पशुहत्या होऊं नये? जितक्या लोकांनीं ह्या शिलालेखांचा अर्थ केला आहे त्यांचें लक्ष ‘हिदा’ अथवा ‘इध’ ह्या शब्दाकडे कसें गेलें नाहीं तें समजत नाहीं. ‘हिदा ना किछी जिवे आलभित्तु पजोहितविंथे नोपि चा समाजे कटविये’—ह्या ठिकाणीं कोणत्याहि प्राण्याची हत्या करून यज्ञ करण्यांत येऊं नये आणि कोणत्याहि प्रकारचा ‘समाज’ करण्यांत येऊं नये. समाज म्हणजे मांस-मदिरेचें सेवन करून चैन करण्याची मेजवानी. ज्या ज्या ठिकाणीं छाकटे शाक्त मांस-मदिरा उडवून संबंध रात्र मौज उडवीत असतील आणि श्रीचक्राचें पूजन करून अनाचारांत मग्न होऊन जात असतील, त्या त्या ठिकाणीं ‘ह्या ठिकाणीं पशुहत्या करण्यांत येऊं नये’ असें या सम्राटानें फर्माविलें असावें. बंगाल ओरिसांतील जनतेनें धर्म-साम्राटाच्या आज्ञेची किती कदर केली त्याचें उत्तर पुरी, भुवनेश्वर आणि कोणार्क येथील मंदिरावरच्या अश्लील मूर्तींच देतील. ह्या मूर्ती पाहिल्यावर भारतवर्षाचा अधःपात कसा झाला असेल ह्याबद्दल आश्चर्य करीत बसण्याचें कारण नाहीं!

खरें पाहातां कालसीची शिळा तमसेच्या संगमावर नसून अमलवा-यमुनेच्या संगमावर आहे. चांगली सुंदर शिला येथें सांपडली असावी म्हणून की अमलवेचें निर्मळ सौंदर्य सम्राटाला अधिक पसंत पडलें म्हणून हें स्थान पसंत करण्यांत आलें असावें हें कोणास सांगतां येईल?

ह्या यात्रेंतील सोबत्यांबरोबर येथें अनेक गोष्टी बोललों. नदीच्या प्रवाहांतील अनेक सुंदर दगड वेंचले. चालू जमान्याला धरून एक दोन फोटोहि काढले गेले. परंतु सारा वेळ मी अंतर्मुखच होतों. सम्राट अशोकाच्या

डोळयांनीं आणि उपगुप्ताच्या श्रद्धेनें येथले प्राचीन पर्वत न्याहाळण्याची माझी इच्छा होती. त्यावेळच्या धर्मपरायण यात्रेकरूंच्या हृदय-प्रवाहाचें दर्शन ह्या नद्यांच्या प्रसन्न पाण्यांत घेण्याचा आणि अडीच हजार वर्षांमध्यें कल्पनेचा पूल बांधून भूत काळाला प्रत्यक्ष करण्याचा प्रयत्न मी करीत होतों.

ती प्राचीन प्रेरणा आज देखील जागृत झाली आहे. तो उल्लास आणि ती श्रद्धा आज नवें रूप धारण करून नवीन प्रयोग करूं पाहात आहे. त्या प्रयोगाचे लेख कोणत्या प्रकारच्या शिळेवर खोदले जातील ? त्याचें स्मारक कोणत्या साधनांनीं भविष्यकाळाच्या हातांत सोपविलें जाईल. आणि आजपासून अडीच हजार वर्षांनंतर ह्याच ठिकाणीं विचरणारे भारतीय अशोकाच्या युगाची आणि आजच्या युगाची कोणत्या रीतीनें तुलना करतील ? तें सारें कवणासि टावें ? कवणें कल्पावें !

---

# * बुद्धगया

११

'ह्या आसनावर बसून बसून माझें शरीर सुकून गेलें तरी चालेल, माझ्या हाडामांसाची माती झाली तरी हरकत नाहीं; तथापि अनेक कल्पना लढवूनहि मिळण्यास कठिण असें तें मोक्षदायी ज्ञान जोंवर मला मिळणार नाहीं, तोंपर्यंत ह्या आसनावरून हा देह चळणार नाहीं.'—अशी भीषण प्रतिज्ञा करून शाक्यमुनि सिद्धार्थ एका पिंपळाच्या झाडाखालीं बसले. देव, यक्ष आणि गंधर्व या अलौकिक लोकनायकाला न्याहाळण्यासाठीं गर्दी करूं लागले. मनुष्याजातीचा शत्रु 'मार' ही प्रतिज्ञा मोडावयासाठी कटिबद्ध आला. घनघोर युद्ध झालें. मारानें भीति, प्रीति आणि प्रलोभन सगळे कांहीं उपाय चालविले. परंतु सिद्धार्थाच्या दृढ निश्चयापुढे त्याचें कांहींच चाललें नाहीं. सिद्धार्थ 'मार–जित' बनला, कृतार्थ झाला. तो बोधीचा आनंद इतका उत्कृष्ट होता कीं, किती तरी दिवस बुद्ध भगवानांना या समाधींतून उतरण्याची इच्छाच झाली नाहीं.

परंतु, शाक्यमुनीचा गृहत्याग केवळ बोधाचा आनंद प्राप्त करण्यापुरताच नव्हता. जगाचें दुःख निवारण करण्याच्या विराट संकल्पानें ज्यानें तपश्चर्या आरंभिली त्याला असें स्वसुख–समाधींत बसून राहणें कसें रुचणार ! समाधीच्या अंतीं आंतला आवाज उठला–' या दुःखी जनतेच्या वेदनांचें काय ! ' तत्क्षणीं शंका उद्भवली—' वेदनांवर औषध तर सांपडलें, पण तें

* 'हिमालयाचा प्रवास' मधील लेख याचबरोबर वाचावा. —संपादक

घेणार कोण ? माझी साधना दुनियेवेगळी आहे. ती कोण ग्रहण करणार ! बळचणींचें पाणी आढ्यावर कसें चढविणार ? '

' हाय ! मग ही अलौकिक तपःश्चर्या, हें दिव्यज्ञान फुकटच जायचें ! '

आकाशांतील देवांचीं विमानें थरथरूं लागलीं, सृष्टि स्तंभित झाली. साधुसंतांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. ह्या क्षणीं जर लोकांचा उद्धार व्हावयाचा नाहीं तर मग तो कधीं व्हायचा ? घोर निराशेचें साम्राज्य पसरलें. इतक्यांत चतुर्मुख ब्रह्मदेव तेथें अवतरले. त्यांच्या चार मुखांचीं निरनिराळीं नांवें—मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा ! या चार मुखांनीं सिद्धार्थाच्या हृदयांत ब्रह्मदेव बोलले—

' गौतमा, ऊठ. तूं बुद्ध झाला आहेस, तथागत आहेस. तूं मारजित झाला आहेस, लोकजित झाला आहेस. सारें जग तुझी वाट पहात आहे. तूं शोधून काढलेला रस्ता नवखा, अपूर्व असो, प्रतीप असो; परंतु तो व्यर्थ जाणार नाहींच. कांहीं लोक अवश्य असे निघतील कीं जे तुझा मार्ग स्वीकारतील. तुझा उपदेश जगभर करतील. त्यांच्यावर श्रद्धा ठेव आणि आपल्या विशाल हृदयांतील गंभीर करुणा सफल कर—'

तथागत उठले आणि धर्मचक्र चालविण्यासाठीं ह्या भूमीवर विचरूं लागले. जेथें जेथें त्यांनीं पाऊल टाकलें, तेथें तेथें अवैर, अहिंसा, प्रेम, करुणा यांचीं कमळें उगवलीं. आणि त्यांच्या विहाराची विहारभूमि त्यांच्या मंगल उपदेशानें सुगंधित झाली.

सनातन इतिहासालाहि सानंदाश्चर्यांत बुडवून टाकणारी ही घटना घडून आज अडीच हजार वर्षें होऊन गेलीं. परंतु धर्मचक्र चालूच आहे. ज्याच्या ज्याच्या हृदयांत त्या महोपदेशाचा प्रतिशब्द उमटतो तो दुःखमुक्त होतो आणि पुनः माराला पराजित व्हावें लागतें.

' भारतवर्षाच्या मोक्षाचा रस्ता मला सांपडला आहे. तो सरळ आहे, धर्म्य आहे, सर्वोदयकारी आहे.' असा उपदेश करीत करीत वायुवेगानें ज्या महात्म्यानें भारतवर्षांत भ्रमण केलें त्याचा उपदेश भारतवर्षाला

मान्य आहे किंवा नाहीं हें ठरविण्यासाठीं आम्हीं यंदा या प्राचीन बोधभूमीवर जमलों होतों. कॉंग्रेसची ' स्वराज्यपुरी ', ' अक्षयवट ' आणि ' बोधिगया ' यांच्या मधोमधच वसली होती. पुष्कळ लोक गाड्यांतून किंवा चालत बोधिगयेला जात होते. कोणी फल्गुनदीच्या रेताड आणि विशाल पात्राच्या सौंदर्याची वाखाणणी करीत होते. कोणी गगनविहारी तालवृक्षाच्या मर्मरध्वनीचें काव्य ऐकत होते. कोणी सस्यशामल अन्नपूर्णेच्या समृद्धीचा विचार करीत होते, तर कोणी दूर दूर बसलेले डोंगर पहारेकऱ्याप्रमाणें लल-कारून आपापसांत काय बोलत आहेत हें ऐकण्याचा प्रयत्न करीत होते. हिमालय आणि विंध्याचल यांच्यामध्यें पसरलेल्या विशाल मैदानांत घडलेल्या अनेक ऐतिहासिक घटनांचे हे डोंगर साक्षी झाले असतील. गयासुराचा प्राण-संन्यास आणि शाक्यमुनीचा गृहसंन्यास तर त्यांनी कालच पाहिलेला आहे. महावीराचें पहिलें-वहिलें स्वागत त्यांनी येथेंच केलें होतें. चीन आणि मध्य आशियांतील मुनींना त्यांनीच उभे राहून मार्ग दाखविला होता. ते आज काय म्हणत असतील ? स्वराज्यपुरीची तुलना ते जनकाच्या ज्ञानसत्राशीं करीत असतील कीं, ' आहे एक आठा दिवसांची गंधर्व नगरी ' असें तुच्छतेनें म्हणत असतील ? त्यांनीं याज्ञवल्क्य आणि जनक यांच्यांतला संवाद ऐकला आहे आणि त्यांनाच सत्यमूर्ति व श्रीनिवास अय्यंगार, रंगा अय्यर आणि शामलाल नेहरू, शिवप्रसाद गुप्त आणि मुरलाल यांचीं व्याख्यानें आठ आठ दिवस ऐकावीं लागलीं आहेत !

कित्येक लोक बिहारच्या भूमीची फलद्रुपता आणि लोकांचें दारिद्र्य यांतील विरोध पाहतात व आश्चर्यचकित होऊन म्हणतात—' अन्नपूर्णेचीं अपत्यें येथें उपाशीं मरतात. दीनवाणीं आहेत. केवढा घोर अन्याय चालत असला पाहिजे येथें ! '

गया स्टेशनपासून बोधिगया सुमारें साडेसात मैल आहे. रस्ता फल्गु-नदीच्या कांठाकांठानें जातो. बुद्धकाळांत या नदीला ' नेरंजरा ' आणि या प्रदेशाला ' उरवेल ' असें नाव होतें. सात मैल रस्ता कापून झाल्यावर

मोठमोठ्या वृक्षांची झाडी दिसूं लागते. उजवीकडे किल्ल्यासारख्या इमारतींची भिंत आहे. या इमारतींत बुद्धगयेचा महंत आपल्या शिष्यासमवेत रहात असतो. तो बौद्धधर्मी नाहीं, तरीहि बुद्धगयेच्या मंदिराची मालकी भोगतो. मंदिराच्या मालकीचें बरेंच जडजवाहिर त्याच्यापाशीं आहे असें म्हणतात. तें ब्रह्मदेशाच्या राजानें मंदिराला अर्पण केलें होतें. या मंदिराच्या मालकीबाबत कित्येक वर्षांपूर्वी तंटा उत्पन्न झाला होता. तेव्हां कोर्टानें मंदिरावर महंताची मालकी ठरविली होती. कलकत्त्याच्या 'महाबोधी' सोसायटीनें या मंदिराचा कबजा मिळवण्याबाबत काँग्रेसकडे इन्साफ मागितला आहे.

महंताची गढी मागें टाकून उजवीकडे चढलें म्हणजे समोरच एक खोल आणि रुंद खड्डा दृष्टीस पडतो, आणि त्यांतच बुद्धगयेचें इतिहास–मंदिर आहे. या मंदिराचा खालचा आणि आसपासचा प्रदेश मातींत दबला गेला होता, तो सरकारी इतिहाससंशोधक खात्यानें सुमारे चाळीस वर्षांपूर्वी खणून काढून साफसूफ केला आहे. मंदिर खूप उंच आणि भव्य आहे. मंदिराच्या आसपासचा कठडा दगडाचा होता. आज त्याचा फारच थोडा अवशेष राहिला आहे. परंतु जें शिल्लक आहे त्याच्यावरील सुंदर कारागिरी आणि भावपूर्ण चित्रें यांवरून मूळच्या सौंदर्याची कल्पना करतां येते. मंदिराच्या भव्यतेच्या मानानें खुद्द मंदिराची कारागिरी तितकीशी आकर्षक नाहीं. भारतवर्षांतील स्थापत्य-कलेचा पहिला बहर शमल्यावर हें मंदिर बांधलें गेलें असावें असें वाटतें. तें पाचव्या शतकांत बांधलें गेलें असावें असें पाश्चात्य संशोधकांचें मत आहे. तें बांधविणारा महापुरुष अमरसिंह होय. अमरकोषाचा रचयिता अमरसिंह तो हाच अमरसिंह जर असेल आणि हाच अमरसिंह जर भोजराजाच्या दरबारांतील एक रत्न असेल तर त्यावरून ह्या मंदिराचा काळ सहज निश्चित होण्यासारखा आहे.

मंदिराच्या बांधणींत खोदीव कामाची पराकाष्ठा झालेली दिसून येत नसली, तरी हें मंदिर इतकें प्रमाणशुद्ध आहे कीं, तें एकाद्या समर्थ स्थापितानेंच कल्पिलें असावें असें नक्की वाटतें. त्यागी, संयमी आणि विरागी बुद्ध भगवा-

नांच्या मंदिरांत लक्ष्मीपति विष्णूची चारुता शोभणार नाहीं असें मानूनच या मंदिरांत कलेचा इतका संयम ठेवण्यांत आला असावा.

मंदिरांत प्रवेश करतांच बोधिगुरु बुद्ध भगवानांची विशाल मूर्ति दृष्टीस पडते. तिच्या मुद्रेवरील मुदिता आणि दृढता आपलें लक्ष वेधून घेतात. पुजारी मूर्तीच्या गळ्यांत वस्त्रें अडकवितात, नाहीं तर मूर्तीचें सगळें स्वरूप मनावर छाप पाडल्याशिवाय रहाणार नाहीं. बाजूला जिने चढून गेलें म्हणजे दोन्ही बाजूंवर उभ्या असलेल्या दोन बोधिसत्वांचें दर्शन घडतें. शिखराच्या आसपास फिरत असतां मंदिराचें प्रांगण दृष्टीस पडतें आणि मोठें शोभायमान दिसतें. मंदिराच्या मागच्या बाजूला एक पिंपळाचें झाड आहे. आणि त्याच्या-खालीं एक मोठी शिळा आहे. या झाडाखालीं आणि त्या शिळेवर बसून बुद्ध भगवानांनीं तपःश्चरण केलें होतें, असें मानतात. हें झाड फार जुनें नाहीं. दहा वर्षांपूर्वी जेव्हां मी येथें आलों होतों, तेव्हां तें फारच लहान होतें. मूळ झाड नाश पावल्याचा इतिहास आहे. या मूळ बोधिवृक्षाची एक फांदी लंकेंत नेण्यांत आली होती. ती अनुराधापूर येथें अद्याप जिवंत आहे. तेथील बौद्ध लोक त्याची पूजा करतात. मंदिराची प्रदक्षिणा संपवितांना त्याच्या डाव्या बाजूला एक लांबलचक ओटा दिसतो. त्याच्यावर उठावदार कमळें आहेत. दयाराम प्रभूची पवित्र पदकमलें जिथें जिथें पडत, तिथें तिथें कमळें फुलत. ही पौराणिक कथा या रीतीनें व्यक्त करण्यांत आलेली आहे. बुद्ध भगवान अंतर्मुख वृत्तीनें या ठिकाणीं येरझारा घालीत असत. त्याला बुद्ध परिभाषेंत ' चंक्रमण ' म्हणतात. आसमंतांत असलेल्या बागेंत पाषाणांतून कोरलेले सुंदर स्तूप आणि मूर्ति आहेत. अनेक भक्तांकडून मिळालेल्या या भेटी येथें स्थापन करण्यांत आल्या असाव्यात.

बिचाऱ्या बोधिवृक्षानें दुनियेचें काय नुकसान केलें होतें ? ना त्यानें कोणाला विष पाजलें ना कोणाच्या हत्येचा साक्षी झाला. ' आर्तांचिया शेल मार्गी ' जे उरले ' तयाचीं सलें ' दूर करण्यासाठीं आपल्या शरीराला सर्व प्रकारें कष्टविणाऱ्या गौतमबुद्धावर त्यानें आपल्या तरल पर्णांची छाया केली,

घाला घातला, तरीहि ' धर्मवेड्या ' अशोकाच्या—होय, अशोकाच्या क्रोधाला तो बळी पडला होता. बौद्धधर्माची दीक्षा घेण्याआधीं अशोकाची त्या धर्मावर करडी नजर होती. हृदयपरिवर्तन झाल्यावर त्याच अशोकानें त्या जागेवर दुसऱ्या वृक्षाचें बीजारोपण केलें. ख्रिस्ती धर्माचा नायनाट करावयास निघालेल्या संत पॉलनें ज्याप्रमाणें आपलें सारें जीवित अखेर ख्रिस्ती धर्माच्या प्रचारार्थ वेचलें, तसेंच त्याच्यापूर्वी अशोकाचें झालें ! इतिहास आणखी असें सांगतो कीं, अशोकानंतर आणखी दोन वेळां हिंदुराजांचे क्रूर प्रहार या बोधिद्रुमाला सहन करावे लागले.

हिंदुस्थानांतील मंदिरें आणि ग्रंथालयांचा नाश करण्याबाबत आपल्या मुसलमान बंधूना जे बिलकुल क्षमा करूं शकत नाहींत त्या हिंदु-बांधवांनीं बोधिद्रुमाचा हा इतिहास लक्षांत ठेवला पाहिजे. कोणताहि असो, अत्याचार हा निंद्य आणि अधर्म्य आहे; परंतु तो दोष अमुक जातींत आहे आणि अमुक जातींत बिलकुल नाहीं असें नाहीं. आणि तसा दोष सर्वत्र आढळ-ल्यावर कोणत्या जातींत तो अधिक प्रमाणांत आहे आणि कोणत्या जातींत कमी प्रमाणांत आहे, याची चर्चा करीत बसणें आज निरर्थक आहे. बुद्ध-गयेंतील बोधिद्रुम अनेक वेळां काढला गेला; पण मूळ फांदीपासून लावलेला वृक्ष अनुराधापुरांत अजून असल्याचें वर आलेंच आहे.

मंदिराला उजवीकडे टाकून सरळ पुढें गेल्यास तलावाचा एक घाट दिसतो. तलाव फार मोठा नाहीं, पण घाट व्यवस्थित आहे. कितीतरी बौद्ध भिक्षुकांनीं आणि श्रमणांनीं या तलावाच्या कांठावर बसून जलमंडलाचें ध्यान धरलें असेल ! !

इतिहासापासून शहाणपण शिकून आपण प्राचीन कारागिरी आणि दंतकथांचा शोध करण्यासाठीं हिंडत असतों आणि प्रत्येक वस्तूचा काळ व शिल्पपद्धति निश्चित करण्यांत पुरुषार्थ मानतों. परंतु हीं मंदिरें म्हणजे कांहीं एखाद्या शरीरशास्त्रज्ञाच्या टेबलावर पडलेल्या कुणातरी अज्ञात, ख्यातिविहीन

जातीचे प्राचीन सांपळे नव्हत. तीं आपल्याच पूर्वजांच्या हृदयाचीं आणि उत्साहाचीं स्मारकें आहेत ! प्राचीन पण सचेतन असा आपणांत प्राण फुंकणारा हा आपला पवित्र वारसा आहे. वाटेल तितकीं खंडित झालेलीं असलीं तरी हीं मंदिरें आपल्याला निष्प्राण, निरग्नि राखेसारखीं वाटूं नयेत. भारतवर्षासाठीं या मंदिरांत अमृत–संजीवनी भरलेली आहे. आपण श्रद्धापूर्वक त्यांचें दर्शन करावें, त्यांचा आशिर्वाद घ्यावा आणि हिंमत असल्यास बुद्ध भगवानाप्रमाणें त्याग करून त्या त्यागाला शोभेल असें आर्यजीवन कंठावें. शाक्यसिंहाची कीर्ति अमरसिंहानें जी अमर केली ती केवळ कौतुक करण्यासाठीं नव्हे, तर आपल्या ' जागरणा ' साठीं, आपल्या कल्याणासाठीं केली आहे.

---

# निर्वाणधाम कुशीनारा १२

स्वत: बुद्ध भगवानांनीं तें म्हटलें कीं, त्यांच्या एकाद्या शिष्यानें त्यांच्या तोंडीं तें घातलें असावें कुणास ठाऊक; परंतु त्रिपिटक ग्रंथांत असें आहे कीं, तथागतांचा जेथें जन्म झाला, ज्या ठिकाणीं त्यांना बोधिज्ञान प्राप्त झालें, ज्या स्थळीं त्यांनीं आपल्या साथीदारांना पहिला-वहिला उपदेश करून धर्मचक्र सुरू केलें, आणि ज्या जागीं तथागतांचें परिनिर्वाण झालें, हीं चार ठिकाणें बुद्ध भगवानाच्या दृष्टीनें अत्यंत पवित्र समजलीं जातील आणि देशदेशांतरांतील लोक ह्या स्थानांच्या यात्रेला येतील.

बुद्ध भगवानांना जेथें 'बोधि' प्राप्त झाली तें स्थान—म्हणजे बुद्ध-गया—मीं सगळ्यांत आधीं पाहिलें. वैराग्याच्या धुंदींत घर सोडल्यावर हिमालयांत जातांना जी त्रिस्थळीची यात्रा केली, त्यावेळीं बुद्धगयेला गेलों होतों. बोधिवृक्षाखालीं किंवा त्याच्या एकाद्या उत्तराधिकारी वृक्षाखालीं उत्कट भक्तिभावानें जेव्हां साष्टांग प्रणिपात केला तेव्हां अंतर्नाद झाला कीं त्याग करणें त्या मानानें सोपें आहे. परंतु त्या त्यागाला साजेसें जीवन व्यतीत करणें कठिण आहे.

जेथें बुद्ध भगवानांनीं आपणाविषयीं अश्रद्धा राखणाऱ्या चार साथी-दारांना उपदेश केला होता, तेथें मी जों गेलों तों या दीक्षावचनानें प्रभावित होऊनच! 'सारनाथ' हें ह्या ठिकाणचें अर्वाचीन नांव आहे. पूर्वी त्याला 'मगदाद' किंवा 'ऋषिपत्तन' म्हणत असत. हें ठिकाण बनारसपासून फार दूर नाहीं. सम्राट अशोकानें येथें एक विश्वसुंदर असा शिलास्तंभ उभा केला

होता. आणि त्याच ठिकाणीं स्वर्गस्थ 'अनगारिक धर्मपाल' वगैरेंच्या पुरुषार्थांमुळें मूलगंध कुटिविहार स्थापन झालेला आहे. आणि ह्या विहारांत बुद्ध भगवानांच्या अस्थींचे अवशेष ठेवण्यांत आले आहेत.

ऐंशी वर्षे अखंड सेवाकार्य करून अखेर बुद्ध भगवानांनीं हा देह सोडला आणि जगांतील साऱ्या जीवांच्या अखंड कल्याणाची कामनाच आपल्यामागे जेथे ठेवली ते स्थान कधींपासून निमंत्रण देत होतें. बुद्धशिष्य दिव्यचक्षु अनिरुद्धाशीं मला त्या ठिकाणीं सत्संग करावयाचा होता.

तथागतांच्या परिनिर्वाणाचें स्थान 'कुशीनारा' हें गोरखपुरच्या पूर्वेस ३०–३५ मैलांवर आहे.

संयुक्त प्रांतांत गंगा मातेच्या समृद्धीमुळें पुष्कळ मोठमोठीं शहरें वसलीं आहेत. त्यांतहि गोरखपुरचें आकर्षण विशेष! रामगड नांवाच्या एका विशाल तलावाच्या कांठीं वसलेलें हें शहर एखाद्या सम्राटाची राजधानी म्हणून शोभणारें आहे. गोरखपुरहून कुशीनाराचा रस्ता बालकाच्या हृदयाप्रमाणें सरळ आणि यौवनाच्या उल्लासासारखा उज्ज्वल आहे. भातशेतीचा चहूंकडे पसरलेला समुद्र आणि त्यांत दुरून एकमेकांशीं विश्वचर्चा करणाऱ्या वृद्ध आंबराया! एक एक आंबराई म्हणजे जणु एक एक धर्मपरिषदच! एका ठिकाणीं शंभर दोनशें कुमार आम्रवृक्षांमध्यें आचार्याप्रमाणें एक वृद्ध वृक्ष होता. त्यांच्यांत बौद्धधर्माची चर्चा चालत असावी कीं, हिंदुधर्मात बौद्ध-धर्माचें स्थान काय आहे याचा ऊहापोह होत असावा?

कुशीनारांत पाहण्यासारखीं तीन-चार स्थळें आहेत. नवीन स्थानांत श्री. जुगल किशोर बिडला ह्यांनीं नुकतीच बांधलेली भव्य धर्मशाला आणि चंद्रमणि नांवाच्या आराकानच्या साधूनें बांधलेला स्वतःचा मठ हीं बघण्या-सारखीं आहेत.

चंद्रमणि साधूला हिंदी भाषा तशी बरी बोलता येते. त्यानें बौद्धसाहित्य भक्तीनें व निष्ठेनें वाचलें आहे आणि जेव्हां कानाला कशीशीच वाटणाऱ्या आपल्या हिंदींत तो बुद्धजीवनांतील प्रसंग सांगूं लागतो, तेव्हां असें वाटतें

कीं, एकादा बुद्धकालीन भोळा साधूच पुन्हां जन्मास येऊन स्वतः पाहिलेल्या गोष्टी रसवत्तेनें व शैलीनें सांगत आहे.

त्याच्या मठांत बुद्धाची जी मूर्ति आहे तिचाहि एक इतिहास आहे. एका स्कॉटिश अंमलदारानें हिंदुस्थानांतील कारागिरीचा नमुना म्हणून ती मूर्ति विलायतेला नेली होती. त्याच्या नातवाला वाटलें कीं, असली ही पूजनीय मूर्ति आपल्या घरीं एक शोभेची वस्तु म्हणून राहावी हें बरें नाहीं. त्यानें विवेकपूर्वक ती मूर्ति हिंदुस्थानांत परत पाठवून दिली. आणि आतां ती कुशी-नारा येथें देशदेशांतरांतील बौद्ध-यात्रेकरूंना कल्याण धर्माचे आशिर्वाद देत आहे. हिंदुस्थानांतून परदेशांत गेलेल्या अप्रतिम वस्तु जर अशाच रीतीनें परत स्वदेशांत येऊं लागल्या, तर इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांच्यामध्यें आध्यात्मिक बंधुत्व सहज जडूं शकेल. ती मूर्ति परत करणाऱ्या बंधुभगिनींचें पत्र जेव्हां मी वाचलें, तेव्हां इंग्लंडविषयीं वाढत जाणारी माझ्या मनांतील निराशा कांहींशी कमी झाली खरी.

कुशीनारा येथील प्राचीन वस्तूंत एक जुनी सुंदर मूर्ति आहे. तिला स्थानिक लोक 'माथाकुंवरची' मूर्ति म्हणतात. माथाकुंवर ह्या शब्दाची कांहींच उपपत्ति लागत नसल्यामुळें आणि हें ठिकाण बुद्ध भगवानाच्या निर्वाणामुळें प्रसिद्ध आहे म्हणून कोणी तरी अर्थ लावला—माथाकुंवर म्हणजे मृतकुमार !

अशा प्रकारची कांहींतरी उपपति पटणें कठीण. मी सुचविलें कीं, माथाकुंवर हा मायाकुंवर याचा अपभ्रंश असावा. बुद्ध भगवानाच्या मातेचें नांव मायादेवी होतें हें सर्वांना माहीत आहे.

मूर्तीच्या आसपासच्या प्रभावळीवरून वाटतें कीं, ती मध्यकालीन असावी. माथाकुंवर नामक एकाद्या बुद्धानुयायानें ती येथल्या संघाला अर्पण केली असावी. आज तिच्या विषयींचा कांहींच इतिहास उपलब्ध नाहीं.

कुशीनारांत विशेष अशा दोनच गोष्टी आहेत. ज्या ठिकाणीं बुद्ध भगवानांनीं देहत्याग केला, त्या ठिकाणीं प्राचीन काळीं एक स्तूप होता तो

भग्न झाला होता. ब्रह्मदेशांतील एका दानशूर गृहस्थानें त्याचा पुनरुद्धार करून त्याच्यावर सोन्याचा पत्रा बसविला आहे. आज तो स्तूप सूर्याचे किरण पडून जेव्हां चमकूं लागतो, तेव्हां बौद्धपुनरुद्धाराविषयीं अनेक आशा निर्माण होतात.

ह्या स्तूपासमोर बुद्ध-भगवानांची सिंहशय्येंत झोपलेली एक विशाल मूर्ति आहे. ती मूर्तिहि फुटून तिचे अनेक तुकडे झाले होते. मथुरेच्या लाल दगडांची ती बनविलेली असल्यामुळे तिचे विखुरलेले तुकडे सहज एकत्र करतां आले. एका इंग्रज शास्त्रविज्ञानें ते सगळे खंडित अवशेष एकत्र करून जोडून टाकले. आणि बौद्धयात्रेकरूंनीं तिच्यावर सोन्याचा पत्रा चढवून तिला पूर्वीसारखी सजीव केली.

सिंहशय्या हें बुद्ध भगवानांचें झोपण्याचें आवडतें आसन होतें. उजव्या हाताचें उसें करून कुशीवर झोपलें आणि उजव्या पायावर डावा पाय व त्याच्यावर डावा हात ठेवला म्हणजे त्याला सिंहशय्या म्हणतात. ह्या शय्येवर झोपल्यानें अल्पनिद्रा घेऊनहि शरीराला विसावा मिळतो आणि वैद्यकीय दृष्ट्याहि ह्या आसनाचे अनेक उत्तम गुण वर्णिलेले आहेत.

ज्या ओट्यावर मूर्तीला ठेवण्यांत आलें आहे, त्याच्या बाजूवर तीन मूर्ती खोदलेल्या आहेत. त्यांपैकीं एक आहे बौद्धकालीन देशविख्यात वैद्य-जीवकाची; मधली आहे त्रिदंडी संन्यासी सुभद्र याची. तो बुद्ध भगवानाच्या अखेरच्या घडीला त्यांच्याकडे शंकानिवृत्तीसाठीं आला होता. पायाच्या बाजूला चिंताक्रान्त अशी जी मूर्ति आहे ती बुद्ध भगवानांच्या अंतेवासी आनंदाची आहे. ह्या तिघांच्या बाबतींत अनेक कथा प्रसिद्ध आहेत. बौद्ध-साहित्यांत ह्या तिघां-विषयीं बराच विस्तृत मजकूर आहे.

हा स्तूप आणि ही सिंहशय्यायुक्त मूर्ति पाहून अडीच तीन हजार वर्षांपूर्वीचें वातावरण एकाएकीं जागृत होतें, हें खरें; पण चित्ताला विषण्ण करून पुनः शांति देणारें स्थान मात्र कुशीनारापासून सुमारें एक मैल दूर असलेला भग्न स्तूप हेंच होय.

ह्या ठिकाणीं बुद्धाच्या अनुयायांनीं बुद्धशिष्य अनिरुद्धाच्या सूचनेप्रमाणें तथागतांची काया कापडांत गुंडाळून तेलाच्या डोणींत ठेवली होती, आणि ते कश्यपाच्या आगमनाची प्रतीक्षा करीत बसेल होते. एकाद्या चक्रवर्तीला साजेल अशा थाटामाटांत कलेवराचें दहन केल्यावर, अग्नि आणि तथागतांची राख यासाठीं ते शिष्य आपसांत भांडले नाहींत, कापाकापी केली नाहीं, त्यांनीं त्या रक्षेचे आठ नऊ भाग केले. सारनाथ येथें सध्यां जें सोन्याचें भांडें ठेवलेलें आहे, त्यांत त्या भागांतीलच कांहीं अवशेष आहेत असें सिद्ध झालें आहे.

ज्या ठिकाणीं तथागतांच्या शवाला अग्नि देण्यांत आला तेथें एक असाधारण उंच असा स्तूप बांधण्यांत आला होता. त्याचेंच आज एका टेंकडीच्या रुपांत दर्शन घडतें. आणि तिच्या शिखारावर विस्तीर्ण आणि खूप उंच पिंपळाचा वृक्ष बौद्धधर्माचें स्मारक म्हणून वाऱ्याबरोबर डोलत असतो. त्या वृक्षाकडे पाहून गीतेंत वर्णिलेल्या अश्वत्थ वृक्षाचें स्मरण झाल्यावांचून राहात नाहीं. त्याच्या उर्ध्व आणि अधःशाखा इतक्या विपुल आणि एकमेकांत गुंतलेल्या आहेत कीं, त्याला हिंदूंच्या समाजशास्त्राचीच उपमा देतां येईल. त्या वृक्षाखालीं एक चिनी साधू राहतो. त्याचे नांव 'सूर्य' का असेंच कांहींतरी आहे. सरकारी पुरातत्व खात्यानें त्याला तेथून काढून लावण्याचा बराच प्रयत्न केला; परंतु पिंपळाच्या आश्रयानें राहणाऱ्या सर्पा प्रमाणें त्याला तेथून हटविण्याची कोणाची हिंमत झाली नाहीं. पिंपळाच्या फांद्यांवर ठिकठिकाणीं बैठकी बनवून त्या साधूनें आपली निवृत्त रसिकता व्यक्त केली आहे आणि तुलसी-रामायणाचें अखंड पारायण चालवून बौद्ध आणि हिंदु धर्माची अभिन्नता उत्तम रीतीनें सिद्ध करून दाखविली आहे.

बुद्ध भगवानांचा उपदेश, त्यांचें जीवन, त्यांची प्रेरणा आणि त्यांचा विस्तार हा मानवी इतिहासांतील सर्वांत महत्त्वाचा आणि सर्वांत मोटा. त्याचें महत्त्व शेकडों आणि हजारों वर्षे झालीं तरी आपण उमजूं शकलेलों नाहींत.

बुद्ध भगवानांचें जन्मस्थान 'लुंबीची देवी' मी अद्याप पाहूं शकलों

नाहीं. त्यामुळें त्याविषयीं आतांच कांहीं लिहित नाहीं. बुद्धमातेच्या स्मरणानें जें स्थान पवित्र झालें आहे, त्याचें महत्त्व माझ्या दृष्टीनें उपरोक्त तीन स्थानांपेक्षां अधिक आहे.

येशू खिस्ताच्या येरुशेलमसाठीं खिस्ति आणि मुसलमान दीर्घकालपर्यंत लढले. पण बुद्ध-भगवानाच्या जीवनाशीं संबद्ध असलेलीं हीं चार स्थानें मानवी विग्रहाचें स्थान होण्याऐवजीं नुसत्या आशियांतील लोकांनाच नव्हे तर साऱ्या मानवजातीला अवैर, प्रेम व विश्वकुटुंबाचा संदेश देणारीं साधनें बनतील, अशी आशा बाळगून त्या कल्याणधामांना आणि त्यांच्यामार्फत व्यक्त होणाऱ्या कल्याण ‘ धामा ’ ला कोटिशः प्रणाम !!

---

## जीवनतीर्थ हरिद्वार

## १३

त्रिपथगा गंगेचे तीन अवतार आहेत. गंगोत्री अथवा गोमुखापासून हरिद्वारपर्यंतची गंगा हा पहिला, हरिद्वारपासून प्रयागराजपर्यंतची गंगा हा दुसरा अवतार. पहिल्या अवतारांत ती पर्वताच्या बंधनांतून—शिवाच्या जटाभारांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करीत असते. दुसऱ्या अवतारांत ती आपल्या सखीला—यमुनेला—भेटण्यासाठीं आतुर झालेली असते. प्रयागराज येथून आपल्या सखीच्या मीलनानंतर झालेला प्रदीर्घ प्रवाह घेऊन सरित्पति सागरांत विलीन होण्याची तळमळ दाखविणारा तिचा तिसरा अवतार. गंगोत्री, हरिद्वार, प्रयाग व गंगासागर हीं गंगापुत्र आर्यांचीं सर्वांत मोटी तीर्थस्थानें आहेत.

जितकें वर जावें तितकें तीर्थांचें माहात्म्य अधिक समजलें जातें. एका दृष्टीनें तें खरेंहि आहे. परतु माझ्या दृष्टीनें हिंदुजातीला अधिक आकर्षक वाटेल असें स्थान हरिद्वारच होय. हरिद्वारांतहि पांच तीर्थें प्रसिद्ध आहेत. पुराणकारांनीं प्रत्येकाच्या माहात्म्याचें श्रद्धापूर्वक व रसभरीत वर्णन केलेलें आहे. परंतु तें महत्व माहीत नसलें तरी ‘ हरिकी पायडी ’ तच गंगेचें माहात्म्य म्हणाल तर माहात्म्य किंवा काव्य म्हणाल तर काव्य इतर सर्व ठिकाणांहून अधिक प्रतीत होतें असेंच कुणीहि म्हणेल.

तसा तर प्रत्येक नदीचा भूमिभाग काव्यमय असतोच. गंगेच्या कांठीं हरिद्वारापेक्षां अधिक रमणीय स्थळें नाहींत असें म्हणण्याचा माझा आशय नाहीं. ‘ हरिकी पायडी ’ च्या आसपास बनारसच्या सौंदर्याचा शंभरावा

भागहि दिसणार नाहीं. परंतु ह्या ठिकाणीं निसर्ग आणि मनुष्य यांनीं एक-मेकांचे वैरी न बनतां गंगेचें सौंदर्य वाढविण्याच्या कामीं सहकार्य केलेलें आहे. गंगेचा तो साधा स्वच्छ प्रवाह, मंदिराजवळचा घाट, घाटाखालचा तो लहानसा वाकडातिकडा खाडा. एका बाजूला हजारों लोक सहज बसूं शकतील असा घाट आणि दुसरीकडे एकाद्या बेटाची गरज भागविणारा जमिनीचा लहानसा तुकडा आणि त्या दोहोंना जोडणारा जुना पूल. हें सगळें काव्यमय आहे. कांठावरचीं मंदिराचीं किंवा धर्मशाळेचीं साधीं शिखरें जरी गंगेकडे वेधलेलें आपलें लक्ष स्वतःकडे खेचून घेत नाहींत, तरीहि तीं सारीं गंगेच्या सौंदर्याचें एक अंग असल्यागत भासतात. बनारसच्या बाजारांत हिंडणारे आळशी सांड निराळे आणि शांतपणे रवंथ करणारे येथले सांड निराळे. येथें गंगेंत चिखल नांवाला मिळणार नाहीं. पाहावें तिकडे अनंतकाळापासून एक दुसऱ्यांशीं टक्कर खाऊन गुळगुळीत बनलेले पांढरे दगडच दगड !

'हरिकी पायडी'तील अत्यंत आकर्षक गोष्टीकडे आपलें लक्ष जात नाहीं. आपणांला फक्त त्याचा परिणामच अनुभवायला मिळतो. आणि ती गोष्ट म्हणजे येथली हवा. हिमालयाच्या दूरदूरच्या बर्फमय शिखरांवरून जो वारा दक्षिणेकडे वाहतो त्याचा स्पर्श पहिल्या प्रथम येथल्या लोकांना घडतो. इतका पावन वायु दुसरीकडे कोठून मिळणार ? 'हरिकी पायडी'पाशीं पुलावर उभे राहिलांत म्हणजे फुप्फुसें आणि हृदय केवळ आल्हादानें भरून जातात. ह्या आल्हादाचें स्वरूप उन्मादकारी नसून प्रशामक असतें !

जितक्या वेळां येथें आलों आहे तितक्या वेळां तीच शांति, तोच आल्हाद आणि तीच स्फूर्ति मी अनुभवली आहे. मुंबईच्या चौपाटीशीं कांहीं लोक ह्या घाटाची तुलना करतात. आत्यंतिक विरोधाचें साहश्य ह्या दोन घाटांत जरूर आहे. येथें यात्रेकरू माशांना खाऊं घालतात, तर तेथें कोळी आहारासाठीं मासे पकडीत असतात.

'हरिकी पायडी' पाहायची असेल तर सायंकाळीं सूर्यास्तानंतर जावें. चांदणें आहे कीं नाहीं याचा विचार करण्याची जरूर नाहीं. चांदणें असेल

तेव्हां एका तऱ्हेची शोभा दिसेल. नसेल तेव्हां दुसऱ्या प्रकारची. ह्या दोहोंत निवड करूं पाहणाऱ्याला कलाप्रेमी म्हणतां येणार नाहीं. संध्याकाशांत एकामागून एक तारे उगवतात आणि खालीं एकामागून एक पेटणारे दिवे त्यांना प्रत्युत्तर देतात. गूढ शांततेमुळें त्या सबंध दृष्याचा एक प्रकारचा मोठा अद्भुत असा परिणाम मनावर होऊं लागतो न लागतो तोंच मंदिरातून घंटांचा होणारा टींग-टांग टींग-टांग असा आवाज आरतीचें आमंत्रण देत असतो.

ह्या घंटानादाला जणूं अंतच नाहीं कांहीं! सारखे टींग–टांग, टींग-टांग चाललेलें असतें आणि भक्तगण निरनिराळ्या आरत्या म्हणतच असतात. पुरुष गातात, स्त्रिया गातात, ब्रह्मचारी गातात आणि संन्यासीहि गातात; स्थानिक लोक गातात आणि प्रांतोप्रांतीचे यात्रेकरूहि गातात. कोणाची कोणाला पर्वा नसते. कोणी कोणाला लाजत नाहीं. प्रत्येकजण आपआपल्या भक्तिभावांत तल्लीन! सनातनी स्तोत्रें गातात, आर्यसमाजी उपदेश देतात, शीख ग्रंथसाहेबाच्या एकाद्या महोल्ल्यांतून आसादिवारची ललकारी ठोकतात. गोरक्षणवाले तुम्हांला सांगतात कीं जगांत शुभ्र रंग आहे; कारण गाईचें दूध शुभ्र आहे. गाईच्या पोटांत तेहतीस कोटी देव आहेत फक्त पोटापुरता चारा नाहीं. कित्येक नास्तिक येथील जमावासमोर ईश्वर नसल्याचें प्रमाणें देऊन सिद्ध करून दाखवितात. आणि उदार हिंदुधर्म हें सारें सद्भावपूर्वक चालू देतो. गंगामाईच्या वातावरणांत कोणीच तिरस्कृत नाहीं. सगळ्यांचा सत्कार होत असतो. भगवे कपडे घालून आपण मुक्त असल्याचा दंभ करणारे मुक्ति फौजेचे मिशनरी जरी उद्यां येथें येऊन हिंदुधर्माचा विरोध करूं लागले तरी आपले यात्रेकरू त्यांचें म्हणणें शांततेनें ऐकून घेतील आणि म्हणतील कीं बिचाऱ्यांना ईश्वरानें जशी बुद्धि दिली आहे तसें ते बोलतात. त्यांचा काय अपराध! हिंदुसमाजांत अनेक दोष आहेत आणि त्या दोषांमुळें त्याला सहनहि पुष्कळ करावें लागलें आहे. परंतु उदारता, सहिष्णुता आणि सद्भाव हें हिंदुसमाजाचें वैशिष्ट्य दोषास्पद म्हणतां येणार नाहीं. उदारतेमुळें हिंदुधर्माला फार सहन करावें लागलें आहे असें म्हणणारे हिंदुधर्माचें मूळच कापून टाकतात.

अजून तो घंटानाद चालू आहे आणि आरतीची वेळ अद्याप संपली नाहीं असें आळशी लोकांना सांगून मानव-जन्माचें कल्याण करून घेण्यासाठीं त्यांना विनवीत आहे.

—आणि त्या युवती आपल्या भाग्याची परिक्षा पाहण्यासाठीं कीं काय, पळसाच्या मोठमोठ्या द्रोणांतील फुलांत तुपाच्या वाती ठेऊन त्या कुरवंड्या नदीच्या प्रवाहांत सोडीत आहेत, आणि ते द्रोण होड्याप्रमाणें हलत डुलत—आपल्यांतील ज्योतीचें महत्व त्यांना समजत आहे अशा प्रकारें डुलत-जीवनाच्या यात्रेला आरंभ करीत आहेत. चालली ती जीवनयात्रा ! एका मागून एक दीपज्योति आपली भाग्यनाव प्रवाहांत लोटत आहेत. मनुष्यजीवनांत जसें घडतें तसेंच येथें ह्या दिव्यांच्या बाबतींतहि घडतें. एकादी अभागी ज्योत यात्रेच्या प्रारंभींच वाऱ्याच्या आहारीं जाऊन चहूंकडे विषादाचें साम्राज्य पसरविते. कांहीं पुष्कळ आशा दाखवून निराश करतात. कांहीं आजन्म रोग्याप्रमाणें कसेबसें दूरपर्यंत जाऊन पोंचतात. केव्हां केव्हां दोन द्रोण जवळ-जवळ येऊन एकमेकांना लागतात आणि मग ती जोड होडी एकाद्या दाम्पत्याप्रमाणें दूरवरचा प्रवास आरंभते. त्यांना गोलगोल फिरतांना पाहून मनांत ज्या भावना प्रकट होतात, त्या व्यक्त करणें कठीण आहे. कित्येकांची जीवन-ज्योति विझण्यापूर्वींच त्या दृष्टीआड होतात. मृत्यु आणि अदृष्ट दोन्ही मनुष्य-जीवनाचे अंतिम अध्याय आहेत. त्या दोहोंसमोर कोणाचें कांहीं चालत नाहीं. आणि त्यामुळें मानवाला ईश्वराचें स्मरण होत असतें. मरण नसतें तर कदाचित् स्मरणहि झालें नसतें.

हिंमत असेल तर एकाद्या दिवशीं सकाळीं चार वाजतां उठून एकटेच ह्या घाटावर येऊन बसा. निराळ्याच 'जाती'चे भक्त तुम्हांला येथें आढळतील. तीन वाजल्यापासून सूर्योदयापर्यंत विशिष्ट लोकच येथें येणार. वाजिनीवती उषा सूर्याला प्रसवते आणि त्याबरोबर व्यवहारकुशल दुनिया या घाटांवर आपलें साम्राज्य बसविते. तसें घडण्याच्या आधींच आपण येथून निघून जाणें उत्तम. आकाशांतील ताऱ्यांनाहि त्यामुळें बरें वाटेल !

---

उत्तर काशी ज्याप्रमाणें साधूंचा ग्रीष्माराम आहे त्याप्रमाणें 'हृषिकेष' आणि 'लक्ष्मणझूला' हेमंताराम आणि शिशिराराम आहेत. ह्या ठिकाणीं स्वर्गाश्रमांत व रामानुज आश्रमांत कांहीं दिवस मीं राहिलों होतों व निवृत्ति-जीवनाचें चिंतन केलें होतें. त्यामुळें पुनः एक वेळ ह्या पुण्यभूमीचें दर्शन घडल्यास किती बरें होईल असें मनांत येत असे. दर्शनाविषयीं जितकी उत्कटता लागून राहिली होती तितकीच भीतीहि वाटत होती. चौविस वर्षांपूर्वीचा स्वर्गाश्रम आज येथें कोठून असणार ? पारलौकिक जीवनाविषयीं श्रद्धा असूनहि ऐहिक जीवनाचा लोभ ठेवणाऱ्या आणि जाणते अजाणतेपणीं आपल्या ह्या वृत्तीचा संसर्ग साधूंना पोहोंचविणाऱ्या भक्तगणांनीं आपल्या दानश्रद्धेमुळें ह्या सगळ्या स्थानाचा बाजार बनविला असेल आणि साधूंच्या राहण्याच्या सुखसोयी वाढल्यामुळें जगांतील दुर्गुणांनाहि येथें वस्ती करण्याची सोय झाली असेल असा विकल्प मनांत येत असे. आम्ही राहत होतों त्याच वेळीं कित्येक साधू आपल्या पोटापेक्षां तिप्पट रोट्या जमा करून त्या रोट्या हिवाळ्यापुरते येऊन राहिलेल्या भाटे लोकांना पैशाला एक ह्याप्रमाणें विकून मिळालेल्या पैशांतून साधू झाल्यानंतरहि अतृप्त राहिलेल्या आपल्या वासना तृप्त करीत असत. त्यावेळीं ऐकलें होतें कीं दूर जंगलांत एक गुप्त मधुशाळा ( दारूची भट्टीहि ) होती. ही बातमी ऐकून मला धक्का बसला होता. तरी ती कितपत खरी आहे याचा तपास करण्याची माझ्यांत हिंमत नव्हती. ती बातमी खरी ठरण्याचेंच भय वाटत होतें. म्हणून त्या बाबतींत संशयाचा फायदा देण्याच्या दृष्टीनें तपास न करण्याचेंच मीं ठरविलें.

त्या ठिकाणीं मी माझ्या आयुष्यांतील थोडासा पवित्रतम काल घालविला आहे. आज जेवढी आठवण आहे, त्याप्रमाणें त्या काळीं मी कोणत्याच प्रकारच्या विकारांना वश झालों नव्हतों. अभिमान, अहंकार आदि मनुष्यसुलभ मनोवृत्तीनाहि ह्या ठिकाणीं कमींत कमी वाव होता.

परमप्रिय जोडीदारांच्या पवित्र सहवासांत समाजहिताच्या अनेक योजना तयार करीत, जीवनांतील जुन्या अनुभवावरून सार काढीत, संतवचनांच्या जिवंत सहवासांत चित्तवृत्तीचें शोधन करीत आणि निसर्गाच्या निर्मळ भव्य सौंदर्यांत तल्लीन होत मी आपले दिवस कंठीत होतों.

ह्या काळांत तपःस्यंचा थोडासा मूढाग्रह मला लागल्यामुळें एक धोतर आणि एक उपरणें हाच माझा पोशाख होता. लंगोटी तर होतीच. कमींत कमी अंथरायचें आणि पांघरायचें, कमींत कमी वेळ झोंपायचें, कमींत कमी बोलायचें, सकाळीं उठून गंगेच्या प्रवाहांत पोटभर आंघोळ करायची, डोक्यावरचे आणि दाढीचे केस वाळवल्याशिवायच एका वेलाच्या झाडाखालीं उघड्यानें जप करायला बसायचें, दोन वेळां अन्नक्षेत्रांतून आणलेली डाळरोटी खायची आणि दिवसरात्र ध्यान किंवा धार्मिक ग्रंथांचें पारायण करायचें हाच माझा व्यवसाय होता. आजूबाजूला पुष्कळसे बंगाली व मद्रासी साधू राहत असत. त्यांच्याशीं गप्पागोष्टी होत असत.

परंतु स्वर्गाश्रमांतलें जीवन मला मानवलें नाहीं. खाल्लेल्या अन्नांतून पुरेसें पोषण शोषून घेण्याची शक्ति आंतड्यांना नसल्यामुळें अधिक खाण्याची संवय पडली. प्रकृति जसजशी बिघडूं लागली, तसतशी अधिक खाल्ल्यावांचून तृप्तीच होईना. आठ-आठ, दहा-दहा रोट्या मी खाई. दोन-दोन चार-चार वाडगे, चण्याची डाळ गट्ट करून टाकी. दुपारीं चणे आणि गुळ मिळाला तर तोहि स्वाहा. त्यांत जिभेचे चोचले नव्हते. परंतु आहारशास्त्राचें थोडेंदेखील भान नव्हतें. भूक कांहीं केल्या थमेना. अखेर पोट बिघडलें. प्रकृति बिघडली. रोज सायंकाळीं थंडी वाजून बराच ताप येई. एका कोसंडी पत्र्यावर चटई टाकून मी

झोपत असें. थंडीचा जोर झाला म्हणजे तो पत्राहि वाजूं लागे. त्याच्या आवाजाचा ताल धरून मी भजनें म्हणत असे. रोज दोन मैल जाऊन भिक्षा आणायची, गंगेच्या कांठीं बसून ती खायची आणि भजन, जप, थंडी आणि ताप ह्यांत साऱ्या दिवसाची विभागणी करून टाकायची, असा रोजचा कार्यक्रम होता.

सगळ्या शरीरावर सुरकुत्या पडल्या. कसलेलें शरीर क्षीण होऊं लागलें. मनाची खात्री झाली कीं, शरीर आतां येथेंच पडणार आहे. त्या खात्रीमुळें आनंद आणि उन्मादहि वाढूं लागला व माझी निवृत्तीची प्रवृत्ति दुप्पट वेगानें सुरू झाली. शरीर पडण्यापूर्वी साक्षात्कार घडणार असा विश्वास वाटत होता. जर मला आहारशास्त्राचें सामान्य ज्ञान असतें, त्या शास्त्राचें थोडें तरी भान असतें, तर माझें जीवन केव्हांच कृतार्थ झालें असतें. मला वाटतें मी जरी जिभेवर चांगलाच ताबा मिळविला असला, तरी आहारावर विजय मिळविला नाहीं. आजहि थोडेंसें अधिकच खाल्लें जातें.

साधकांना माया कशी परास्त करूं शकते आणि त्याच्या न्यूनतेचें मर्म पाहून तेथेंच कसा वार करते ह्याचा अधिक एक पुरावा देण्यासाठीं हें सगळें येथें लिहिलें आहे.

त्याकाळीं मला हिंदी बोलतां येत नव्हतें. त्यामुळें लोकांशीं बोलतांना व प्रवासांत अडचण वाटत असे. म्हणून मी माणूसघाण्या बनलों. गुन्हेगाराच्या तोंडावर जसा फजीत होण्याचा, तिरस्कृत होण्याचा भाव दिसून येतो, तसा माझ्याहि मुद्रेवर दिसत असे, असें मला कांहींसें आठवतें. आपला कोठें सत्कार होईल अशी अपेक्षाच वाटत नसे. सगळेच माझा तिरस्कार करतात, मला त्याज्य समजतात, अशी भावना हृदयांत खोल रुजून बसली होती. माझ्या आत्मक्लेशास ही भावना पोषक असल्यामुळें ती काढून टाकण्याचा मी कधींच प्रयत्न केला नाहीं. प्रयत्न केला असता तरी त्यांत मला यश आलें असतें कीं नाहीं कोण जाणें !

अशा समयीं स्वामी आनंद मला भेटायला 'अलमोड्या'हून एकाएकीं आले. माझी स्थिति पाहून ते चमकले व त्यांनीं सर्व प्रकारें मला चांगला करण्याचा प्रयत्न सुरू केला. त्यावेळची त्यांची सहानुभूति खरोखरच दैवी होती. वीरोचित तर खरीच; परंतु सेवावीर काय काय करूं शकतो त्याचें त्यांनीं उत्तम उदाहरण घालून दिलें. ते मला स्वर्गाश्रमांतून हृषीकेश येथील रामानुज आश्रमांत घेऊन आले. तेथले दिवस अनेक रीतींनीं संस्मरणीय झालेले आहेत. तीं सर्व संस्मरणें येथें उतरलीं पाहिजेत; परंतु तेवढा धीर कोठें आहे ? त्यावेळीं समाजहिताच्या ज्या असंख्य योजनांची आम्हीं चर्चा केली व निर्णय घेतले त्यांचा विस्तृत अहवाल जर लिहून काढला—आणि तसें करणें अशक्य नाहीं—तर माझ्या जीवन-तत्वज्ञानाच्या पायापैकीं पुष्कळसा भाग तेथेंच बांधला गेला, असें म्हटलें तरी चालेल. देवाची पूजा, दुर्गा सप्तशतीचा पाठ आणि शक्ति उपासना यांचा तो काळ होता. माझ्या शक्तिउपासनेंत वामाचाराचा जरासुद्धां स्पष्ट अस्पष्ट अंश नव्हता. आध्यात्मिक शक्तिची उपासना होती. महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वती यांचें ब्रह्मविद्येच्या प्राप्तिसाठीं समष्टिरुपानें होणारें तें ध्यान होतें. निसर्गाकडे त्या काळीं मी कलाधराच्या नजरेनें पहात नसून कलाधराची दृष्टि शुद्ध करून कलातीत होण्याचा प्रयत्न करणाऱ्या, निष्कळ परब्रह्माचा निसर्गाच्या द्वाराहि साक्षात्कार करून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या, साधकाच्या नजरेनें पहात होतों. त्यामुळें निसर्गानें किंवा निसर्गात जें चैतन्य अखंड धारेच्या रूपानें स्फुरतें त्याच्याशीं तन्मय होण्याचे माझे प्रयत्न चालत असत. जेव्हां जेव्हां स्वर्गाश्रम आणि त्यावेळचें वातावरण यांचा विचार करूं लागतों, तेव्हां तेव्हां ती साधना पुनर्जागृत होते आणि काव्यानंदापेक्षांहि कांहीं अंशीं वरच्या प्रकारचा आनंद अनुभवाला येतो.

त्याकाळीं मराठी भाषा समृद्ध करण्याचे, तिच्या काव्यांतील अमृत-संजीवनींत अवगाहन करण्याचे, सेवाश्रम स्थापन करून दरिद्र-नारायणाशीं एकात्म पावण्याचे, वेश्यांच्या वस्तींत राहून त्यांच्या जीवनांतील मळ धुवून

काढण्याचे, मोठमोठीं विशिष्ठ विद्यालयें स्थापून आर्य-संस्कृतीचें पुनः उद्दीपन करण्याचे, संस्कृत भाषेचें सारामृत हिंदुस्थानांतील सगळ्या भाषांना पाजण्याचे, ग्रामीण कलाकुसरींत शोधक बुद्धि आणण्याचे, प्रत्येक मंदिराच्या ऐवजीं एकएक जीवनसंस्था स्थापण्याचे, एक मोठें जहाज भाड्यानें करून हिंदुस्थानांतील सर्वोत्तम विद्यार्थ्यांना जगाची मुशाफरी करविण्याचे, युरोपांत शहारों शहरीं निरामिषाहारी भोजनगृहें काढून तेथें शाकाहाराचा प्रचार करण्याचे, चीन, तिबेट, तार्तरी आणि रशियापर्यंत पायीं प्रवास करण्याचे, हिंदुस्थानांतील सगळ्या पर्वतांवर जबरदस्त 'हेलियोग्राफ' ठेऊन स्वदेशी तारखातें उघडण्याचे, अफगाणिस्तान व इराणमध्यें राहून इस्लामी धर्मसंस्करण करण्याचे, हिंदुधर्म आणि बौद्धधर्म यांचा समन्वय करून जपान, चीन, स्याम, ब्रह्मदेश आणि हिंदुस्थान यांचें विशाल पायावर संघटन करण्याचे— असे अनेक संकल्प आणि योजना मी मांडीत असें. काय काय झालें पाहिजे, तें कशाप्रकारें करतां येईल, या बाबतींत कल्पनातरंग चालत असत. मीं स्वतः ह्या सगळ्या योजनांचा आरंभ कोणत्या प्रकारें करीन ह्याची कल्पनाहि माझ्या मनांत येत नसे. आणि त्याबद्दल मला खेदहि वाटत नसे. केव्हां केव्हां वाटत असें कीं, ह्यापैकीं एकादा संकल्प खूप उत्कटतेनें आणि एकाग्रतेनें साधावा. योगयुक्त स्थितींत संकल्पीत राहिलों तरी जगांत त्याचे वातावरण निर्माण होईल आणि ती गोष्ट आपोआप लोकांकरवीं साध्य होईल. दुनियेला समजणार देखील नाहीं कीं, ह्या सगळ्याच्या मागें माझें संकल्पबल काम करीत आहे. परन्तु आपला संकल्पयोग सिद्ध झाला याचें मला समाधान वाटेल.

एके दिवशीं एक शंका मनांत आली आणि संकल्पयोगाचा उन्माद कांहीं अंशीं शमला. इतक्या उत्कटतेनें हे सारे शुभसंकल्प एकामागून एक स्फुरतात ही माझीच साधना आहे कीं एकाद्या लोकोत्तर महात्म्याच्या जबरदस्त संकल्पाच्या लहरी माझ्या हृदयापर्यंत येऊन पोंचत आहेत आणि मला अस्वस्थ करून माझ्या हृदयाची तयारी करीत आहेत ?

अशा शंका मनांत आल्यामुळें म्हणा किंवा निवृत्ति पचूं शकली नाहीं

म्हणून म्हणा, अथवा ध्यानांतून त्यावेळीं पाहिजे होतें तितकें समाधान मिळालें म्हणून म्हणा, पुन्हां प्रवृत्ति मार्गांत येण्याचें सुचलें. आणि मग हृषीकेशचें जीवन आणि हृषीकेषचें चिंतन स्वप्नमय, काव्यमय, संस्मरणमय होऊन बसलें. केव्हां केव्हां मनांत अशी शंकाहि येई कीं, हृषीकेष नांवाचें एकादें स्थळ खरोखर आहे कीं, ती सगळी स्वप्नसृष्टीच? हृषीकेशला जाऊन आलेले लोक जेव्हां भेटत तेव्हां त्यांच्याशीं वार्तालाप करून मी गुपचुप आपली खात्री करून घेत असे कीं नाहीं, खरोखर तें स्थळ तेथें आहे आणि मी तेथें राहूनहि आलों आहे. कधीं कधीं असें मनांत येई कीं, इतकी सविस्तर स्मृति म्हणजे एकादें स्वप्न तर नसावें? शेवटीं कुतुहल वाटलें आणि मनाशीं निश्चय केला कीं आपण मथुरेचे श्रीकृष्ण बनूं नये. श्रीकृष्णांनीं एकदां जें गोकुळ-वृन्दावन सोडलें तें सोडलेंच! ते पुन्हां कधींच परत वृन्दावनाला गेल्याचें वर्णन नाहीं. मला तें जुनें हृषीकेश पुन्हां पाहिलेंच पाहिजे. आजच्या दृष्टीला तें कसें दिसतें, हें अजमावलें पाहिजे.

अध्यात्मिक वृत्तीला प्राधान्य देऊन शिक्षण व जनसेवेचें कार्य करणाऱ्या देवशर्माजींनी मला ह्या वर्षीच्या गुरुकुल उत्सवास येण्याचें निमंत्रण दिलें. ओढूनच घेऊन गेले असें म्हटलें तरी चालेल. म्हणून अनायासेंच हृषीकेशला जाण्याची संधी मिळाली. दुसरीं पण कारणें घडलीं. आणि पंजाबकडील दोन गुलाबी पंजाब्यांबरोबर त्यांच्या मोटारींतच आम्हीं लक्ष्मण-झुल्यापर्यंत जाण्यासाठीं निघालों. पूर्वी गेलों होतों तों पायीं आणि अज्ञात भविष्यकालासाठीं केवळ श्रद्धेची शिदोरी घेऊन जाणाऱ्या सारखा. ह्यावेळीं एकाद्या श्रद्धालू यात्रेकरूं-प्रमाणें मोटारींतून जुने अनुभव जागृत करण्यासाठीं स्मरणयात्रेचें एकादें प्रकरणच जगत आहें असा गेलों. जीवनाचा आनंद कणशः आणि क्षणशः घेतां येतो. परंतु, स्मरणयात्रा केव्हां मोटर वेगानें, तर केव्हां मनोरथ वेगानें करावी लागते. म्हणून मोटार नेण्यांत कांहीं संकोच वाटण्याजोगें नव्हतें. त्यावेळचा उन्हाळ्याचा ताप आणि ह्यावेळचा हिंवाळ्यांतील पाऊस हे देखील दोन्ही यात्रांना अनुरुप असेच होते. तराईतील झाडें वाऱ्यापासून सुरक्षित

असल्यामुळें सज्जनांच्या कल्पनांप्रमाणें पृथ्वींतून सरळ आकाशाकडे धांव घेत होतीं. वाळलेलीं पानें वाऱ्याशीं खेळून हास्यविनोद करण्याऐवजीं रडीचें राज्य मिळविणाऱ्या मुलाप्रमाणें पर्जन्य बिंदुमुळें प्रसन्न होऊन चमकत होतीं. रेल्वेचा अरुंद रस्ता जंगल व श्रद्धा यांना खंडित करून लोकांचें कुतूहल शमविण्या-साठीं धांवत होता. मोटर जसजशी पुढें जाई, तसतशीं जुनीं संस्मरणें ताजीं होत जात. ह्या पहाडी झऱ्याच्या कांठीं मी आंघोळीसाठीं थांबलों होतों—तेथें संध्यावंदन केलें होतें—येथें—

आजिचा सुदिनरे सुदिन ।

आमुचा उदयला भाग्याचा, आमुचा उदयला भाग्याचा ।।

हें पद गाईलें होतें, आणि लक्ष्मीनारायणाला साष्टांग दंडवत घातलें होतें. ह्या ठिकाणीं हरिहराच्या जयगर्जनेंकरून मिळालेली रोटी व डाळ खाल्ली होती—ह्या ठिकाणीं झाडांच्या छायेंतील झऱ्यांच्या कांठीं स्वामींवर चिडलों होतों आणि त्या ठिकाणीं एका बंगाली ब्रह्मचाऱ्याबरोबर चैतन्य संप्रदाय व शक्तिउपासना यांचा बंगालवर जो परिणाम झाला, त्याबाबतींत चर्चा केली होती. पुढें एक ठिकाण आलें. जेथें बसून एका योगमार्गी साधूशीं आजच्या योगसाधनांतील दोषांची चर्चा करून त्याला नाराज केल्याचें आठवलें, तर दुसऱ्या ठिकाणीं भूस्तरशास्त्रांच्या सिद्धांताप्रमाणें हिमालयाच्या रचनेचा विचार केला होता. एका स्थळीं भूतिया लोकांच्या दर्शनाबरोबर एक जुनें स्मरण ताजें झालें. सकाळीं उठून हृषीकेशहून हरद्वारला जात होतों. वाटेंत भूतिया लोकांच्या दोनचार झोपड्या जळून भस्म होत होत्या. आणि ते बिचारे धांवपळ करून त्या आगींतून आपल्या मौल्यवान वस्तु वांचविण्याचा प्रयत्न करीत होते. दुसऱ्या दिवशीं दुपारीं त्याच रस्त्यानें परत फिरतांना पाहिलें तर त्या लोकांनीं जंगलांतून गवत लांकडें आणून आणि त्या गवताच्याच दोऱ्या वळून पहिल्यासारख्याच झोपड्या उभारल्या होत्या आणि त्यांत त्यांची कच्चींबच्चीं किलबिल करीत होतीं.

हिमालयाच्या हवेंत थोडी जरी आर्द्रता जमली कीं, इंद्रधनुष्याचें दर्शन हें घडायचें! ह्यावेळीं समोरच्या डोंगरावर—डोंगरावरील आकाशांत नव्हे, तर डोंगराच्या विशाल वक्षस्थलावर—इंद्रधनुष्याचा एक पट्टा दृग्गोचर होत आहे. हिरव्या झाडीच्या पार्श्वभूमीवर तें निघाल्यामुळें थोडेंसें कृष्ण होतें. परंतु, त्यामुळें त्याच्या मोहकतेंत कोणतेंच न्यून आलें नव्हतें. पळती मोटार जसजसें आपलें तोंड फिरवी तसतसें इंद्रधनुष्यहि स्थानान्तर करीत असे.

क्षणोक्षणीं मनांत येई कीं, आतां हृषीकेष येईल आणि मग तेथल्या वाढलेल्या बाजारामुळें आणि परदेशी मालाच्या दुकानामुळें माझीं जुनीं स्मृति-काव्यें भंग होतील. अखेर हृषीकेष आलें. बाजार व दुकानेंहि दिसूं लागलीं. शिलाजिताच्या जाहिराती डोळ्यांत खुपूं लागल्या. आणि हा सारा अत्याचार सहन करण्यापेक्षां पुढें जाण्यांतच श्रेय असतें, हें माहित असल्यामुळें मी म्हटलें, “ आपण येथें न थांबतां सरळ लक्ष्मण–झुल्यापर्यंत जाऊं या. ” मोटार सुरू झाली. तों कित्येक उंट आणि खेचरें हजर. उंट आणि डोंगर यांचें सूत केव्हांच जमत नाहीं. मोठमोठीं वाळवंटें ओलांडणारा हा रणवीर लहानशी टेकडी पाहिली कीं बुजूं लागतो. आणि आतां आपलें काय होईल ह्या भीतीनें अस्वस्थ होऊन चहुंकडे आणि आकाशाकडे पाहूं लागतो. बैल, हत्ती, उंट ह्यासारखे भव्य आणि गंभीर प्राणी अस्वस्थ झालेले पाहून माझी स्वतःचीच फार तारांबळ उडते. त्यांत उंटाची स्थिति फारच वाईट. त्याची लांब मान आणि किडकीडीत पाय त्याच्या अस्वस्थतेमुळें अगदींच हिडीस दिसूं लाग-तात. त्यापेक्षां पंख न आलेली घार किंवा कावळे यांची पिलें पाहणें चांगलें.

आमच्या समोर उभे असलेले स्वागत समितीचे हे चतुष्पाद सभासद घाबरलेले दिसत नव्हते. परंतु, अस्थानीं होतें हें खरेंच. खेचरांची गोष्ट निराळी. मजुर आणि दुकानदार यांच्याप्रमाणें त्यांनाहि कोणत्याहि परिस्थि-तींत स्थान आहे. आमच्याशिवाय तुमचें चालणार नाहीं असा भाव त्यांच्या डोळ्यांत स्पष्टपणें दिसत होता.

आतां गार व गोड वारा वाहूं लागला. आणि त्याबरोबरच विचारांचे वारेहि बदलले. जसजसें वर जाऊं लागलों, तसतसें जीवनाविषयींचे विचार आणि जीवनावर प्रकाश टाकणारें अध्यात्म्य आपलें स्वामित्व मनावर गाजवूं लागलीं. आमचा रस्ता दर्शनशास्त्राप्रमाणें जंगलांतून पुढें जाऊं लागला. समोरच्या भव्य पर्वताचें एक शिखर खालीं कोसळलें होतें आणि रक्तप्रवाहाप्रमाणें दगडांची एक नदी त्यांतून खालीं सरकत होती. ही 'दृषतसरा' 'तन्वंगी' होती; परन्तु 'तरला' नव्हती, उर्मिलाहि नव्हती. रुद्रा व दुर्गा होती. इंद्र आपलें जुनें वैर विसरलेला नाहीं, संधी साधून हिमालयाच्या शिखरांवर आपल्या वज्रांचे प्रहार करीत असतोच. इंद्रानें चपलेसह आपलें वज्र फेंकलें कीं पर्वतांतून पार्वती प्रकट झालीच समजा! परंतु, ह्या पर्वतांतून एकादी पार्वती निघण्यासारखी नव्हती, म्हणून तिची जागा दृषद्वतीनें घेतली. खरोखर त्या दृष्यानें माझें लक्ष पुष्कळ वेळ वेधून घेतलें आणि पौराणिक कथेची सत्यता त्या वेळेपुरती पटविली.

लक्ष्मणझुल्या जवळचे डोंगर असे वसले आहेत कीं, पाहणाराला वाटावें, गंगेचा उगम येथेंच असावा. तो स्वर्गाश्रम दिसूं लागला. परन्तु तेथली पूर्वीची बोरीची झाडी दिसत नाहीं. आतां तो बद्रिकाश्रम उरला नाहीं, आणि स्वर्गाश्रमहि राहिला नाहीं. आम्हीं जेथें उभे आहोंत, तेथून तो आश्रम इतका खालीं आहे आणि तेथें फिरणारीं माणसें अशीं वालखिल्याप्रमाणें भासत आहेत कीं, त्या ठिकाणाला स्वर्गाश्रम म्हणवत नाहीं. शुभ्र शुभ्र मंदिरें आणि झोंपड्या पावसाळ्यांत अळंबी उगवतात तशा दिसतात. दोन तपापूर्वीची माझी झोपडी तरी आपल्या जागीं राहिली असेल का? कोठून असणार! सगळेंच फिरलें तर तो माझा बिल्वाश्रम, त्याच्या जवळून वाहणारा लहानसा झरा, कोपऱ्यांतली माझी झोपडी आणि शेजारची ती वाघाची दरी हें तरी सारें आज कोठून राहणार!

झरा आटला. झोंपडी नामशेष झाली. बेलाचें झाड कापलें गेलें, तरी ती वाघाची दरी आणि तिच्या खालचा गंगेचा घेरा हीं तर जागच्या जागीं राहतील! आम्हीं उभे होतों त्या उंचीवरून दरी व घेरा शोधून काढण्यास वेळ लागला नाहीं.

परंतु, जेव्हां त्या दरीच्या बाजूला माझी तीच झोंपडी दृष्टिला पडली, तेव्हां माझा हर्ष गगनांत मावेना. अधिकार नसतांहि भर्तृहरीचा श्लोक मी गाऊं लागलों—

भस्मोध्धूलन भद्रमस्तु भवते रुद्राक्षमाले शुभम् ॥ इ.

ज्या झोपडीनें मला आपल्या साधनेच्या कालांत आश्रय दिला, तिच्याबद्दल मातृभक्तीची भावना मनांत निर्माण व्हावी ह्यांत आश्चर्य तें कसचें? ह्याच झोपडीचे दाराशीं मी कोणी तरी महात्मा आहे असें समजून दार ठोठावून दर्शन देण्याविषयीं यात्रेकरू याचना करीत असत. ह्याच झोपडींत बसून ब्रह्मचारी गिरिधारींची जीवनकथा मीं ऐकली होती. लक्ष्मणझुल्यापाशीं राहणारे अनंतबुवा मला ह्याच झोंपडींत येऊन भेटत असत आणि श्रीरामचंद्र-प्रभूच्या दर्शनाची त्यांना लागलेली तळमळ व्यक्त करीत असत. आणि मी देखील क्षणोक्षणीं चित्तशोधन करून ईश्वरकृपेला लायक बनण्याचा अखंड प्रयत्न करीत होतों. केव्हां केव्हां माझ्याच मनांत शंका येई कीं, मी आपल्या मनांत भलभलते विचार कोंडून ठेवून त्यांचें मूळ तपासण्याचा प्रयत्न करीत असतो, वेडा तर नाहीं मी?

माझ्या जीवनांतील अनेक घटना मंगळवारीं घडल्या आहेत. ह्या ठिकाणीं राहावयास आलों तो देखील मंगळवारच होता. म्हणून प्रथम मी त्या झोप-डीला मंगलाश्रम हें नांव दिलें. परंतु नंतर जेव्हां शेजारच्या बेलाच्या झाडाखालीं आसन ठोकून, ओलेत्यानें सकाळपासून दुपारपर्यंत जप करायला बसूं लागलों, तेव्हां त्या सबंध कोपऱ्याचें नांव 'बिल्वाश्रम' ठेवणें हेंच मला योग्य वाटलें. दर्शनकार म्हणतात कीं, सृष्टि नाम-रूपात्मक आहे; खरें पाहतां रूप सृष्टि निस-

र्गाची आहे. नांवें तर माणसानें दिलेलीं असतात. माणसांच्या दुनियेंत नाममहात्म्य अधिक आहे. नामांतून रूपाकडे जाणें आणि शेवटीं दोन्ही गोष्टींना मागें टाकून वस्तूला ओळखणें हीच मनुष्याची बौद्धिक साधना आहे. वासनांना नष्ट करून संकुचितता काढून टाकणें आणि अनासक्त प्रेमानें सर्वांशीं ऐक्य अनुभवणें ही हार्दिक साधना आहे. ध्यान व तप यांच्यायोगें ह्या दोन्ही गोष्टी साध्य झाल्यावर देखील कर्मरूपी यज्ञद्वारा त्या परमतत्त्वाची अभ्यर्चना केल्याशिवाय मनुष्याला सिद्धि प्राप्त होत नाहीं अशी खात्री झाली तेव्हां हें स्थान सोडून सेवाक्षेत्रांत जाण्याचा संकल्प पटवून घ्यावा लागला.

ह्या ठिकाणीं येऊन राहिलेले सगळेच भैक्षसेवी कांहीं साधु नसतात. म्हणून येथें अनाचाराला वाव मिळतो. तरी देखील हें स्थान अद्याप जागृत असल्याबद्दलचा आपला अनुभव अनेक साधूंनीं प्रकट केला आहे. मलाहि असा अनुभव आला आहे कीं, जेव्हां मनुष्य उत्कटतेनें प्रयत्न करतो तेव्हां त्याची साधना येथें मोठ्या गतीनें होते. आणि त्यांत कमीतकमी अंतराय येतात. महान साधकांनीं ह्या वातावरणांत ही अनुकूलता ओतली असावी. संस्था व मंदिरें ह्याविषयीं प्रेम ठेवणारे आजचे साधु तसेच दान व त्यांची जाहिरातबाजी करणाऱ्या संगमरवरी पाट्यांचे प्रेमी यात्रेकरू ह्यांनीं हें जुनें वातावरण नष्ट करण्याचा प्रयत्न अगदीं कसून चालविला आहे. आतां तें माहात्म्य ह्या प्रयत्नापुढें किती दिवस टिकतें तें पाहावयाचें आहे!

लक्ष्मणझुल्यावरचें दृश्य मनुष्याला कधीं तरी विसरणें शक्य आहे कां? पूर्वीचा पूल (झुला) पुष्कळ वर्षांपूर्वी वाहून गेला. म्हणून सरकारनें पुष्कळ खर्च करून चांगला मजबूत झूला ( हँगिंग ब्रिज ) येथें बांधला आहे. जुना पूल बांधणाऱ्या शेटजींच्या मुलानें हा पूल बांधण्याचा खर्च सरकारला देऊन आपल्यासाठीं व आपल्या पूर्वजांसाठीं पुण्य संपादन करून ठेवलें आहे. आणि हा पूल ओलंडण्याचा कर सरळ किंवा आडमार्गानें यात्रे-करूकडून वसूल करण्यांत येणार नाहीं असें सरकारकडून कबूलहि करून घेतलें आहे.

गंगा जेव्हां पावसाळ्यांतील 'वार्षिक' पुरामुळें किंवा उन्हाळ्यांतील हेम पुरामुळें अगदीं जोरानें वाहत असते तेव्हां हा पूल वरच्या बाजूला धांवत आहे असें खालीं पाण्याकडे पाहणाऱ्याला वाटतें.

लक्ष्मणझुल्याची खुबी ही आहे कीं, येथला गंगेचा प्रवाह गंभीर आणि शांत आहे. येथें जर दगडावर बसून विशुद्ध मार्गात सांगितल्याप्रमाणें जलमंडळाचें ध्यान केलें तर चित्तवृत्ति तावडतोब एकाग्र बनते. बिल्वाश्रमापासून थोडेसें खालीं जेथें पाणी उथळ आहे आणि खळखळ वाहतें तेथला पाण्याचा भुरकट हिरवा रंग आणि त्याच्यावरील गोमुत्रिका बंधासारख्या रेषा कविवृत्तीला अनुकूल आहेत, ध्यान करण्याला नाहींत. गंगेचा अखंड कलरव अनाहत ध्वनीस दाबून टाकीत असावा. येथून दूर हृषीकेशाकडे पाहिलें असतां गंगेचें रूप निसर्गमनोहर भासतें. अडथळा दूर होतांच प्रसन्नमनें ती वाहते, मोठमोठे दगड व लहानमोठीं झाडें यांना आपल्यांत समावून घेते, बोबडे बोल ऐकविते आणि मुक्तीचा आनंद व्यक्त करते. ज्या संत मुनींनी हें स्थान पाहिल्यानें शोधून काढलें आणि तीर्थस्थान ठरविलें ते मोठे कवि असले पाहिजेत. काव्यमय स्थानाला विलासभूमि बनविण्याऐवजी तपोभूमि बनविणारें मनुष्यहृदयच काव्याची कदर करूं जाणें. कवीचा कलात्मा जीवनाला विलासानें उथळ बनविण्याऐवजीं संयम आणि तप यांनीं अथांग बनविण्यास कारणीभूत होईल तर त्यांतच त्याची कृतार्थता आहे.

परत फिरतांना संध्येचें साम्राज्य पसरूं लागलें. जंगलांची घनता अधिक आकर्षक दिसूं लागली. पश्चिमेकडील सूर्यकिरण पूर्वेकडील डोंगरावर पडून तेथील रंगी-बेरंगी झाडांना आपलें वैशिष्ट दाखविण्यासाठीं निमंत्रण देऊं लागले. हिरव्या रंगाचे देखील किती प्रकार असतात! आणि कित्येक झाडें तर कोणताच संकोच न धरतां हिरवा रंग फेंकून देऊन तांब्याचा रंग धारण करून उभीं होतीं; परंतु तीं कांहीं संन्यासी बनलीं नव्हतीं. रसिकतेचाच तो नवा प्रकार होता. आतां इंद्रधनुष्य दिसत नव्हतें, पण

पर्वतावरील झाडें, त्यांचीं पानें आणि त्यांच्या शिरांवर शोभणारे पांढरे शुभ्र ढग या सगळयांनीं मिळून इंद्रधनुष्याइतकेंच सौंदर्य निर्माण केलें होतें.

आम्हीं पुढें निघालों. सायंकाळहि अधिक होत चालली. डाव्या बाजूला वेदांती संन्याशांची प्रख्यात झाडी दिसूं लागली. येथेंच विवेकानंद आणि अभेदानंदासारखे संन्याशी प्रस्थानत्रयीचें अध्ययन करते झाले होते. येथेंच पलिकडच्या कांठावर प्राचीन संन्याशांनीं आपल्या देहावर झेप घालून त्याच्या चिंध्या करणाऱ्या वाघाच्या क्षुधानिवृत्तीचा आनंद अनुभवला होता आणि सोहं सोहंच्या गर्जनेनें आपली अनुमति व तृप्ति अखेरच्या क्षणापर्यंत प्रकट केली होती. व्यास आणि शंकराचार्य ह्याच ठिकाणीं बसून भारतधर्म घडवीत होते आणि त्याच्यांत तेज ओतीत होते. त्यावेळचा त्यांचा भावनाप्रवाह कोणत्या प्रकारचा असेल कोण जाणे ! मौन धारण करून बसलेल्या मुनींसारख्या पर्वतांना माहित असलें तरी ते सांगणार नाहींत ! आणि ही समुद्रगामिनी गंगा पूर्वकाळचें स्मरणहि करीत नाहीं !

आतां ऋषिकुल आलें. लक्ष्मणझूला, स्वर्गाश्रम आणि झाडीच्या दर्शनाचा उन्माद आमच्यांत इतका आला होता कीं, आतां हृषिकेशच्या बाजारांत इकडे तिकडे गेलों तरी त्याचा विषाद मनांत निर्माण होण्याला जागाच नव्हती. आम्ही सरळ त्रिवेणीवर गेलों. तेथें मला माझ्या जुन्या काळच्या दोस्त माशांच्या वंशजांना पहावयाचें होतें. ज्या ठिकाणीं बसून अन्नक्षेत्रांतील रोट्या मी खात असें त्या ठिकाणीं बसून आज खजूर संत्री खायचीं. त्या काळीं माझ्या आनंदांत भाग घ्यायला ध्यानप्रेमी अनंत बुवा होते. ह्यावेळीं त्यांचें स्थान सेवाप्रेमी बबलभाईनीं घेतलें आहे. दोघांनीं एकमेकांना पाहिलेलें नाहीं. परंतु दोघांतील साम्याचा मी साक्षी आहें जीवनाच्या दुसऱ्या तीरावर हे दोघे जेव्हां एकमेकांना भेटतील तेव्हां एका क्षणांत सख्खे भाऊ बनतील. मी जेव्हां बुवांना भेटेन, तेव्हां अगोदरपासून त्यांना बबलभाईविषयीं सांगून ठेवीन. चांगल्या लोकांचा परिचय करून देणें हा खरोखर परमानंद आहे.

सूर्यानें आतां प्लॅटिनमचा रंग धारण केला होता. चांदीची उग्र चमक आणि सोन्याची भव्य कोमलता यांचें योग्यप्रमाण जेव्हां ब्रह्मदेवाला सुचलें, तेव्हां त्यानें प्लॅटिनम धातु निर्माण केला असावा. तिचें सौंदर्य पारखण्यासाठीं कलात्मक दृष्टीचा विकास झालेला असला पाहिजे. हें दृश्य पहात असतां सूर्याचें सोनें झालें. परन्तु केशरांच्या फुलाविषयींची ईर्ष्या त्याच्या मनांत उत्पन्न झाली त्याच क्षणीं त्याच्या सोन्याचें तांबें झालें. समभावी ढगदेखील तावडतोब भडकले आणि त्यांनीं आकाश लाल लाल करून टाकलें. रस्त्यावर हिंडणाऱ्या संन्याशांचें भगवे कपडे ह्या सबंध दृष्यांत मिसळून जावें ह्यांत आश्चर्य तें काय !

— समाप्त —